मनोहर ग्रंथमाला पुष्प ३५ वें.

# गावरान-गीता

लेखक

नरसिंह चिंतामण केळकर



एकमेव विक्रेते : मनोहर ग्रंथमाला, पुणें.

मूल्य दोन रुपये

ऑगस्ट १९४४



हें गीताविषयक पुस्तक

# कै० सदाशिवशास्त्री भिडे

[ गीतावाचस्पति, गीताधर्म मंडळाचे पहिले चालक ]

यांच्या

स्मृतीस अर्पण केलें आहे.

# गावरान गीता

## संवाद १ ला

कांहीं वर्षांपूर्वी प्रकृती सुधारण्यासाठीं मी कोकणांत माझ्या खेडेगांवीं जाऊन राहिलों होतों. दिवस उन्हाळयाचे. तथापि सगळा दिवस आमराईत काढतां येई. रात्रीं उघडच्या मैदानीं अंगणांत पलंग टाकून निजें. यामुळें आठहि प्रहर मोकळी हवा मिळे. पाणी तर विचारायलाच नको. पोहण्यासारखी मोठी विहीर, आणि जांभ्या दगडांतलें मधुर स्वच्छ पाणी पिण्याला मिळेल असा राखीव झरा. वाटेल तेव्हां ग्रीष्म ऋतूंतली कोकणी फळफळावळ यथेच्छ खावी. दिवसां 'कुकर' वर स्वयंपाक करून भात, व भातांत शिजविलेले कणकेचे मुटके तुपांत बुचकळून खावे. संध्याकाळ होण्याच्या सुमारास हातानं गाईची धार काढून पाऊणशेर धारोष्ण प्यावं. रात्रीं जेवण वर्ज्य.

हा दिनक्रम सर्व ओसरल्यावर वेळ जाण्याची खरी अडचण रात्रीं आठापासून वाटे. अंधार पडल्यानंतर सर्व लिहिणं वाचणं बंद् असं मनानं ठरविलंच होतं. पण युद्धपरिस्थितीमुळं मेणबत्ती तर राहोच, साधं राकेल देखील मिळेना. त्यामुळं आयतीच सबब झाली. तेव्हां झोंप लागेपर्यंत पलंगावर पडून, आकाशाकड पहात, चिंतन करीत, तोंडाला येतील ते श्लोक, स्तोत्रपाठ, सुभाषितं, गायकी कविता इत्यादि म्हणें. स्वस्थतेचा भंग होण्याचं मुळींच कारण नव्हतं.

मी अंगणांत पलंगावर निजें. सोबतीला एक शेतकरी असे. तो गोठ्या-बाहेर उघडी पडवी होती तींत निजे. पण इतका जवळ कीं, पडल्या पडल्या आम्हां दोघांना एकमेकाशीं सुखानं मध्यम आवाजानं संभाषण करितां

येई. केव्हां केव्हां फार उकडूं लागलं म्हणजे त्याची म्हातारीहि पडवीच्या दुसऱ्या टोंकाला आपलं कांबळ पसरून निजे.

या सोबती गड्याचं नांव गेनू आणि त्याच्या आईचं नांव सावित्रा. दोनहि माणसं कशीं पण बिनखोट, उपयोगी, उपकारी, सालस असत. त्या दीड महिन्यांत त्यांनीं माझी सेवाचाकरी अशी केली कीं बोलायची सोय नाहीं. मला कुळवाडी जातींत एक भाऊ व आई लाभली असं परत येतांना वाटूं लागलं. त्यांना सोडून येतांना डोळ्याला पाणी आलं.

रोज रात्रीं गेनू व मी आम्ही दोघेहि आपापल्या अंथरुणावर झोपेची आराधना करीत पडायचे, आणि वेळ जाण्याकरितां उगीच कांहीं तरी विषय काढून बोलायचे. पहिल्याच दिवशीं मीं त्याची हकीकत विचारून घेतली. ती अशी होती. तो म्हणालाः—

" माझ्या बापानं तरुणपणीं भोळेपणानं, लबाड सोबत्यांच्या संगतीनं, नसते व्यापार करून होतं नव्हतं तें सर्व घालविलं. जमिनीचा एक तुकडा होता तोहि विकावा लागला. मग आमच्या या गांवच्या एका कोकणीं व्यापाऱ्यानं मुंबईत इमारती लाकूड, हापूस पायरीचे आंबे, नारळ, अमसुलं, कोकम इत्यादि कोकणी बंदरी मालाचं दुकान घातलं होतं, त्यावर एक नोकर म्हणून राहण्याकरितां ओळखीनं आस्थेनं त्यानं माझ्या बापाला बोलावलं. तेव्हां आई व मी यांना घेऊन बाबा या कोकणाला जवळ जवळ शेवटचा रामराम करूनच गेला.

" मुंबईस या दुकानावर त्यांचीं वीस वर्षं गेलीं. त्यांत मालकाला अतोनात नफा झाला. देव जाणो काय कीं, पण त्यानं नोकराचा—म्हणजे माझ्या बाबाचाच—हा पायगुण असं मानानं मानून त्याच्या नांवं दुकानांत एक खातं उघडलं. आणि त्यांत, माझ्या बापाला न कळतां, पगाराशिवाय दरसाल पन्नासपाऊणशें, शंभरदीडशें, केव्हां दोनशें असे रुपये त्याच्या नांवं जमा करूं लागला. मात्र ही रक्कम एकदम दिली तर उपयोग होईल, दरसाल दिली तर खर्चून जाईल, अशा विचारानं मालकानं आम्हा कुणाला याची कांहींच वार्ता कळूं दिली नाहीं. वीस वर्षांत मी व माझी आई यानींहि

नोकऱ्या करून आपलं पोट भरलं. माझं लग्नहि मुंबईसच करून दिलं, पण ती बायको वारली. तेव्हां मीं फिरून लग्न करायचं नाहीं असं ठरवून आईबापांची थोडीशी नाराजीहि सोसली.

"नोकरीचीं वीस वर्षं भरल्यावर मालकानं एक दिवस माझ्या बाबाला हांक मारून म्हटलं, 'हें पहा, धाकू, मीं जन्मभर उद्योग केला. पैसाहि पुष्कळ मिळविला. आतां मुंबई सोडावी, एक वर्षभर यात्रा-प्रवास करावा, मुलूख पाहावा, आणि परत कोकणांत आपल्या गांवीं जाऊन सुखानं काळ काढावा असं वाटूं लागलं आहे. मग तूं काय करणार? तुला, सावित्राला, गेनूला सर्वांना आज वीस वर्षं मुंबईची चांगली माहितगारी झाली आहे. इथं कुठंही नोकरी करून पोट भराल. माझ्या एखाद्या व्यापारी स्नेह्याची गांठ घालून देऊं कां, बोल!"

"हें ऐकून माझ्या बापाच्या डोळ्याला पाणी आलं. तो म्हणाला,— बरं आहे धनी! पण मलाहि या मुंबईचा आतां कंटाळा आला आहे. म्हातारपणहि डोकावूं लागलं. मलाहि वाटतं मुंबई सोडून तुमच्याबरोबर यात्रा कराव्या, मुलूख पहावा, आणि मग कोकणांत आपल्या गांवीं जाऊन सुखानं रहावं. पण बापा-आजाचीं घरचीं मालकी उत्पन्नाचीं ठिकाणं होतीं तीं मीं मूर्खपणानं आंतबट्यानं व्यापारउदीम करून घालविलीं. घर विकलं. मग कोकणांत परत जाऊन काय करणार? इथंच जन्मभर राहून राबून काढूं आम्ही उरले दिवस. इथं पोट भागलं, भागतं, भागेल. पण शिलकी पैसा कुठं आहे? मग कशाच्या जिवावर मीं कोकणांत जाणार आणि राहणार? जा तुम्ही धनी! तुम्ही भाग्यवान. तुम्हीं मागच्या जन्मीं देवाला दिलं असाल म्हणून त्यानं तुम्हांला चांगली बुद्धि आणि पैसा दिला. तुम्हीं कां करूं नये यात्रा? आणि कां जाऊन सुखानं राहूं नये आपल्या मायभूमि कोकणांत? पण मीं कुठं दिलं मागच्या जन्मीं देवाला म्हणून त्यानं तरी मला द्यावं? कुणा स्नेह्याची ओळख करून देऊन इथंच नोकरी लावून देतों म्हणतां-तर बरं द्या. मीहि पाहीन. गेना मोठा झाला. तोहि कांहीं उद्योग पाहील. पण तो असा उदास.

फिरून लगीन करायचं नाहीं म्हणतो. तेव्हां आतां त्याला तरी एकट टाकून आम्ही कुठं जाणार ?

" असं म्हणून माझा बाबा, मोठा प्रेमळ सच्चा माणूस, रडूं लागला. तेव्हां काय गंमत झाली म्हणून सांगूं दादा तुम्हांला ? "

मीहि मोठ्या उत्सुकतेनं म्हणालों ' अरे वा:, सांग सांग ना काय गंमत झाली ती. ऐकण्यासारखीच असेल बहुधा. '

गेनू म्हणाला—" गंमत अशी झाली बघा. आमच्या मालकानं एकदम जमाखर्चाची वही टाकली माझ्या बापापुढं. ती उघडून त्याच्या नांवाचं खातं काढलं. आणि शेवटच्या ओळीवर बोट ठेवून तो देवमाणूस काय म्हणतो—' धाकू, गड्या तूंहि भाग्याचा आहेस, बरं. तुझं भाग्य आणि माझं भाग्य दोन्हीं कशीं आज वीस वर्षं हातांत हात घालून चालतं आलीं आहेत. हें पहा. तुझ्या नांवावर आज तारखेला त्रेपन्नशें रुपये जमा आहेत. आणि जमा आहेत म्हणजे तुझेच आहेत. म्हणजे तूं हवे म्हणालास तर आतां याक्षणीं तुझ्या पदरांत पडतील. मग तुझीहि इच्छा आहे का कोकणांत परत जाऊन राहायची ? '

" माझ्या बापाला याचा अर्थच उमगेना ! मी यावेळीं जवळच उभा होतों. पण मलाहि उमगेना. गडी पेशांत राबून मिळविलं तेवढ्यांत गुजारा करून राहणारं आमचं कुटुंब ! आमच्या नशिबीं त्रेपन्नशें रुपये कुठून येणार ? पण कोडं उलगडेना तरी ती थट्टा मात्र वाटली नाहीं. आणि आम्ही दोघे आनंदानं ढसाढसा रडूं लागलों. तेव्हां खरं तें सगळं समजावून देण्याच्या इच्छेनं मालकानं, ही रक्कम बाबाच्या नांवावर दर वर्षी कशी व कां जमा होत गेली, व व्याजानं कशी वाढत गेली, हें सारं उलगडलं. आणि म्हणाला, ' मी म्हणत होतों—मनांत नेहमीं—जसा मी तसा तूं. तुलाहि कोकणांत परत जाण्याची इच्छा होणारच. म्हणून आगाऊच माझ्याबरोबर तुझीहि तरतूद अशी करीत गेलों—देवदयेनं झालन् काय ? ' शेवटीं धन्यानं बाबाला आपल्याबरोबर यात्रेलाहि नेलं. ते दोघे परत येईपर्यंत मीं इकडं कोकणांत येऊन हें, तुम्ही पाहतां तें,

ठिकाण पसंत करून, साडेतीन हजार रुपयांना खरेदी घेतलं. शेंदोनशें रुपये लावून गडगा घातला. शंभर रुपये लावून ही झरी, पाणी प्यायची, स्वच्छ करून खोल उकरून बांधून घेतली. दोन बैल घेतले. दोन दुभतीं जनावरं घेतलीं. एक सरकती ठेवला. झालं. देवाच्या दयेनं पोटभर सुखाचं अन्न मिळतं. आल्यागेल्याचा पाहुणचार करतों. आईला सुखांत ठेवली आहे. वाईट येवढंच वाटतं कीं, परत कोकणांत आल्यावर दोन वर्षांनींच बाप वारला. पण तो आनंदांत गेला."

गेनूची ही हकीकत ऐकून मी गहिंवरलों. मी पलंगावरं उठून बसलों. गेनूला म्हणालों "गड्या, तूं सांगितलंस असलं मालकाच्या भलेपणाचं वृत्त ऐकायला दुर्मिळच. खराच तुझा बाप भाग्यवान. मला वाटतं त्याच्याच पुण्याईनं इथं आल्यावर माझी प्रकृति इतकी सुधारली."

मग आणखी अशाच इकडच्या तिकडच्या, कांहीं कोकणच्या, कांहीं देशावरच्या, गोष्टी बोलून त्या दिवशीं आम्ही झोपीं गेलों.

## संवाद २ रा

मग दुसरे दिवशीं रात्रीं अंथरुणावर पडल्या पडल्या मीं रचलेलीच एक कविता मला सहज आठवली ती म्हणूं लागलों. 'सुग्राम कीं कुग्राम' असं त्या कवितेचं नांव आहे.

गेनू म्हणाला, 'दादा तुम्हाला बरीं हो गीतं आठवतात म्हणायला, अशा या भिकार गांवांत? मीं समजतों कीं, अगदीं नाइलाजानं, प्रकृती बरी होण्याकरितां चार दिवस इथं कोकणांत तुम्ही आलां. बरे होतांच जाल वाऱ्यासारखे नाहीं तर पाखरासारखे उडून देशावर, आपल्या गांवीं, आपल्या उद्योगाला. आणि इथं दिवस काढीत असाल तरी काय? कष्टानं, एखाद्या कैदखान्यांतल्या सारखे. इथं कशाची करमणूक

होणार तुम्हाला ? जिन्नस तरी काय मिळणार ? मुंबई पुण्याच्या मार्किटांत जा छप्पन्न देशचा माल मिळतो तिथं. जरा रिकामा वेळ सांपडला, खिशांत चार रुपये असले, कीं धावले थेटराकड नाटक सिनेमा पाहायला. नाहीं तर राणीचा बाग आहे, बंडगार्डन आहे, सहल करायला. याच्याहि उप्पर तुमच्या त्या सभा. त्यांत काय म्हणे पुरुष गातात, बायका गातात नाचतात. मुंबईत तर काय मुंबईच आहे. पण ‘ जिवाची मुंबई ’ करायला पुणं कांहीं अलीकड कमी पडत नाहीं म्हणे माणसाला. तिथंच गळा काढून गाणीं म्हणायला सुचायचीं. म्हणून म्हणतों, अशा या कुग्राम वस्तींत तुमच्या तोंडाला गाणं गीत कसं येतं याचं आश्चर्य वाटतं. ”

मी मनांत समजून होतों कीं याचं हें मला लावून बोलणं थोडं वरकरणीं होतं. उगीच मला चिडविल्यासारखं करून अधिक बोलायला लावण्या-करितां होतं. म्हणून मी म्हणालों “ अरे गेनबा, तूं वेडा आहेस. तोंडाला गाणं येणं हेंच माणसाच्या आनंदी-उल्हासी वृत्तीचं खरं लक्षण असतं. दुःखांत चिंतेंत असणाराच्या तोंडून गाणं कधींच उमटायचं नाहीं. इथं माझी प्रकृति साफ बरी झाली हा तर उल्हास आहेच मला. पण खेडेगांवाला तें केवळ खेडेगांव म्हणून कुग्राम म्हणणारापैकीं मी असेन ही तुझी समजूत अगदीं चुकीची आहे. जसा मुंबई टाकून कोंकणच्या या मायभूमीच्या खेड्यांत आलास तसा मीहि कांहीं वर्षांनीं आलेला तूंच पाहशील. आतां माझी अगदीं जन्मभूमीच जिला म्हणेन असं कोणतं गांव इकड नाहीं, माझा जन्म देशावर झाला, याला इलाज नाहीं. पण जन्म देणं येवढाच का गुण कोणत्याहि भूमींत असतो ? या गांवाला तूं कुग्राम म्हणतोस हा अन्याय आहे. मी याला सुग्रामच म्हणतों. ’

‘ दादा ’ गेनबा म्हणाला ‘ भलीं माणसं कुणा वाईटालाहि भलेपण द्यायला तयार होतातच. ’

‘ तसं तोंडदेखलं बोललों नाहीं मी गेनबा. शहरांत काय असतं म्हणून तें सुख देतं, आणि नाहीं म्हणून इथं अडतं, तें सांग पाहूं. ’ असं म्हणून मीं माझ्या पद्याचा अर्थ त्याला समजावून सांगितला.

मी म्हणालों ‘ शहर गांवांत सुखाचीं साधनं असतात. पण इथं तीं नाहींत म्हणून कांहीं अडत नाहीं. आपण अगदीं पहांटे पासूनचा दिनक्रम घेऊं. शहरांत आम्हांला पहांटे उठायला घड्याळावर गजर लावून ठेवावा लागतो. पण मी इथं आल्यापासून पहांटे उठलों नाहीं असं कधीं तरी झालेलं तूं पाहिलं आहेस काय ? ’

‘ मग तें कसं होतं, दादा ? ’

‘ अरे तुझ्या खुराड्यांत कोंडलेला कोंबडा अगदीं कसा वेळेवर ओरडतो ! गजर लावायला एखाद दिवस विसरलों कीं घड्याळ मला कसं उठविणार ? पण कोंबड्याला गजर कुणी लावून ठेवला सांग ? तो अंधारांत असला तरी पहांट झाल्याचं त्याला नक्की समजतं. तसंच पहांट झाली कीं त्या शेजारच्या घरांतल्या बायका दळण घालून गाणीं म्हणूं लागतात. किती गोड गळा अन् किती गोड गाणीं ! राजे लोकांना जागे करायला पगारी भाट बडबडायला ठेवावे लागत म्हणे. पण या प्रेमळ गाण्यांची सर त्यांना येईल काय ? दळण दळीत, घरकाम करीत, या घरच्या देवी इकडे उद्योगशील पुरुषांना जागे करितात, आणि उलट अवेळीं जाग्या झालेल्या आपल्या मुलांना, मांडीवर पडल्या पडल्या, गाण्याच्या नादांत झोंप आणतात. जाळ तीं कर्कश गजरीं घड्याळं. आणि ऊन्ह पडूं लागल्यावर तर नुसती सावली पाहून किती वाजले असतील हें मी सांगूं शकतों. हवं कशाला घड्याळ ?

‘ आतां चल पुढं. शहर गांवांत सकाळीं घरच्या घरीं प्रातर्विधीची सोय असते. पण कोण ती तिथली घाण ! म्हणे पाण्यानं स्वच्छ होणारे नव्या पद्धतीचे संडास ! पण तिथंच कितीतरी डांस. आणि जर कां पाणी कमी पडलं म्हणजे मग ? आहेच तुला मुंबईचा अनुभव ! उलट इथं शेंपन्नास पाउलं चालत गेलों कीं प्रातर्विधीला किती तरी मनपसंत सोईच्या जागा ! या कामीं मारवाडी लोकांचं उदाहरण घेण्यासारखं आहे. अगदीं शहर गांवच सोडलं तर, मारवाडी सकाळीं उठून प्रातर्विधीला बाहेर लांब गेल्याशिवाय आढळायचा नाहीं.

'आतां घे तोंड धुणं. शेतांत बागेंत हिंडून लिंबाचं बाभळीचं ताजं दांतवण हातानं काढून घ्यावं. आणि त्यानं दांत घाशीत शतपावली करीत पक्ष्यांचं गाणं ऐकत हिंडावं. नाहीं तर ती एक रुपयाची विलायती ओली राखुंडी, किंवा आमची देशी माकड छाप टूथ पावडर! घेताहेत पांढरं तोंड काळं करकरून दांत घासतांना. दांत स्वच्छ करण्यापेक्षां या राखुंडीनं रंगलेलं तोंड स्वच्छ करण्याचेच श्रम अधिक!'

'अन् दादा, मी कधींपासन बघतो. तुम्हीं पुण्या-मुंबईतल्यासारखे आपल्या हातानं आपली हजामत करीत नाहीं! गांवच्या न्हाव्यालाबी बोलावांत नाहीं. ही अशी दाढी वाढलेली आवडती तुम्हाला?'.

'अरे त्यांत काय आवडायचं नि नावडायचं? दाढी वाढली तरी ती आपली आपल्याला बोचत नाहीं कांहीं. मला तर दाढीचं भूषण वाटतं. नाहीं तर ती रोज सकाळीं उठून खटपट! हजामत करून चेहऱ्यावर तुळतुळीतपणा आणून वास लावलेली राखाडी फासण्यापेक्षां, प्रकृती रसभरित राहिल्यानं तोंडावर आलेला गुलाबी नूर किती चांगला? आतां चहा. मी रोज सकाळीं चहा घेणारा आहें खरा. पण इथं धारोष्ण दूध पिण्याला मिळायला लागल्यापासन मला चहाची आठवणहि होत नाहीं. वाईट एवढंच वाटतं कीं, परत गांवीं गेल्यावर, घरीं दुभतं जनावर ठेवण्याची सोय साधन नसल्यामुळं, धारोष्णाला मुकून पुन्हां चहाकडून स्वारी करून घ्यावी लागणार! गवळ्यानं घातलेलं निरसं पण नीरस दूध कधीं निर्भेळ तरी मिळालं आहे का? मग धारोष्ण दूरच. दुधाबरोबर पाव बिस्किट नसेना कां? पण दूध पिऊन झाल्यावर, हातानं उकरून काढलेल्या, गावरान भुइमुगाच्या शेंगा खायला मिळतील तर हव्या. कोकणांत त्या मात्र मिळत नाहींत. पण झाडावरन काढून लगेच फोडून खायला रसाळ फणस मिळतो, त्याची सर दुसऱ्या कशाला येणार सांग बरं! तसंच कोसभर हिंडून आल्यावर घामानं ओलसर झालेला सदरा काढून ठेवून घटकाभर उन्हांत बसावं. अशी अंगांत विरविरी येती काय सांगूं? असं केल्यानं मग स्नान करायची पोहायची खरी लजत येते. घटकाभर खुशाल

डुंबावं नदींत. आणि मध्यें एकदां वर येऊन रिठ्याचं पाणी अंगाला चोळावं कीं, साबण लावल्यापेक्षां अंग स्वच्छ ! काय त्या साबणवड्या— एक रुपयाला तीन म्हणे ! पैसा कसा मिळवावा हें शिकविण्यापेक्षां खर्च कसा करावा हें मात्र अधिक शिकविलं बघ या इंग्रजी विद्येनं आम्हांला ! घरीं मीं खरोखरच चांदीच्या ताटांत जेवतों. पण इथं आल्यावर मी पत्रावळी लावायला शिकलों. किती आनंद झाला म्हणून सांगूं ! जेवणाच्या आधीं पंधरा मिनिटं तो उद्योग. ताजीं झाडाचीं मोठमोठीं पानं काढावीं, आणि चोयट्या करून पत्रावळ लावावी हवी तेवढी मोठी. मीं पहिल्या दिवशीं पत्रावळीचा पहिला घेर पुरा केला. वाटलं कीं, प्रतिब्रह्मदेव आहें ! पत्रावळ लावतांना वाटे ही नवी कला मला कशी साध्य झाली ! कलाच आहे ती. चोईच्या टाक्याखालीं पानाचा भाग नेमका दडवायचा नेमका बाहेर काढायचा ! टाके असे समांतर सारख्या मापाचे लावायचे ! आणि पत्रावळ हळू हळू गोल आकाराची डौलदार बनली म्हणजे तिच्याकड पाहत बसावसं वाटतं. अशा पत्रावळीवर जेवल्यांत चांदीच्या ताटांत जेवल्यापेक्षां काय कमी आहे सांगरे गेनबा ! झालं. मग कुकरवरची स्वादिष्ट रसोई खावी. मुखशुद्धीला ताजे काजूगर सोलून खावे. जेवल्यावर आंबराईतल्या दगडी ओट्यावर छायेंत पथारी पसरून समुद्राचा वारा खात झोंप काढावी— '

'पण दादा, इथं तुम्ही वर्तमानपत्रंहि मागवीत नाहीं कधीं हें कसं ? कवा तरी एखादं घरगुती पत्र कार्ड येतं तुम्हांला एवढंच पाहतों ? '

' अरे अजीर्ण झालेल्याला उपोषण हें जसं औषध, तसं वर्तमानपत्र न वाचणं हें सुखाला लागलंय मला हल्लीं. टपालानं वर्तमानपत्र मजकडे न यावं अशीच व्यवस्था करून आलों. त्यामुळं मन किती कोरं राहतं ! नाहीं तर गांवीं पाहतों, सकाळीं उठलं कीं चहाच्या जोडीला हें ताजी बातमी वाचण्याचं व्यसन. सांग बरं, वर्तमानपत्र न वाचल्यानं तुझं कांहीं अडलय कां ? '

' अडल नाहीं दादा ! पण जगांत काय चाललं हें थोडंबहुत कळाव वाटतं खरं ' गेनू हंसत म्हणाला.

' मग पत्र न वाचतांहि तुला कळतं कीं नाहो, थोडं बहुत, या देशांत काय चाललं आहे तें ? का अजून पेशवाई मोगलाई राज्यच आहे या कोकणांत असं तुला वाटतं. '

' तस कस होईल, दादा ? राज्य गोऱ्यासायबाच हें कळतय कीं. अन् मग त्ये आमच आम्हांला देऊ देऊ म्हणतात, आम्हीं द्या द्या म्हणतो, हेंहि कळतं कीं मला. '

' त्याचं असं आहे, गेनबा, अगदींच येवढं ढोबळ कळून निभत नाहीं खरं. यापेक्षां खोलांतलं कळलं तर हवं. पण वाटतं कीं रोजची ताजी बातमी वाचायची हें एक व्यसनच होऊन राहतं. आज झाडाचं रोप लावलं जमिनींत, तर तें किती उगवलं हें पाहायला उद्यां तें उपटायचं, अन् खालवर करायचं याला काय म्हणावं ? रोपाला नवा कोंब फुटला, नवं पान फुटलं, असं व्हायला दहा पांच दिवस लागतातच. तेव्हां दमानं घ्यावं. पान वाढत असतांना कोंब दिसलाय का कुणाला ? आणि एका जागीं दोन पानं आलीं, फुलं धरलीं फुललीं, हें एकदम पाहिलं म्हणजेच खरं आश्चर्य वाटतं अन् आनंद होतो, पाहणाराला. मीं एथं असाच महिना-भर काढणार, रोजचं वर्तमानपत्र वाचल्याशिवाय. आठवड्यांतन दोनदां निघणारा केसरी तेवढा वाचतों. पण वाटतं कीं, आठवड्यांतन एकदांच निघणारा केसरी वाचला तर बातमीची खरी नवलाई वाटेल. एकदम कांहीं कळण्यानं जी नवलाई वाटते ती रोजची बातमी वाचण्यांत वाटत नाहीं. इकडचं जग थोडसं तिकडं कलंडेल तेव्हांच तुला तें कळायचं, गेनबा. तुला नवलाई केवढी मोठी ! तूं सुखी गड्या. '

गेनबा म्हणाला, ' वाः दादा, तुम्ही तर लईच मागासलेले दिसतां. कुणी तुम्हांला मुलखावेगळेहि म्हणेल. कारण इतके शिकले-सवरलेले. चार पैसे मिळतात. चार लोक तुमचं नांव घेतात. जाल तिथं लोक थोडा तरी मान देतात. अधिकार देतात. असं असतां, तुम्ही आम्हां-सारख्या खेडवळाच्या रीतीनं राहतां, अन् तसं राहायला गोड वाटतं असं खऱ्या मनानं बोलतां, म्हणून आश्चर्य वाटतं. बाकी आम्हां खेडवळांना

आमच्यापरी सुख नाहीं असं मात्र मी कबूल करणार नाहीं. मी पण चैनीला चटावलेला असतों, तर मुंबई सोडून कां येतों परत कोकणांत? आतां, आमच्या मालकांनीं एका रकमेनं पांच हजार रुपये दिले ते दिले नसते तर आम्ही, मनांत असूनहि, कुठचे येत होतों म्हणा कोकणांत?—पर—'

मी मध्येंच म्हणालों, 'अरे गेनबा, इतके रुपये मिळाले तेव्हां तुझं लक्ष इकडं खरं नसतं, तर तूं दुसरंच कांहीं केलं असतंस त्या रुपयांचं. मुंबईतच एखादं लहानसं पण मालकीचं दुकान घातलं असतंस. तयार पैशाला पाय फुटायला मुंबईतल्या मुंबईत वाटा काय थोड्या आहेत? आणि तुम्ही मेहनती माणसं, दुकानदारीच्या अनुभवानं एकाचे दोन पैसे करूंहि शकलां असतां सहजासहजीं. पण तसं न करतां तुम्ही साधी राहणी पतकरून, समाधानी वृत्ति ठेवून, कोकणांत परत आलांत यांतच तुमच्या खऱ्या आवडीची परीक्षा झाली. माझीहि वृत्ति तशीच. म्हणूनच तुझी संगत बरी वाटते. असो. आणखी पंधरा दिवस महिनाभर हें सुख लाभणार खरं. हा आमच्यासारख्यांना नवा अनुभव आहे.'

इतकं बोलणं झाल्यावर आम्ही दोघे झोपीं गेलों.

## संवाद ३ रा

मग एकदोन दिवसांनीं, असाच अंथरुणावर पडल्या पडल्या, गीतापाठ थोडा मोठ्यानं म्हणत होतों. तो ऐकून गेनू म्हणाला, 'दादा, आज तुम्ही तोंडान म्हणतां त्यांतलं कांहींच उमगत नाहीं कीं! कालचं तें मराठी गीत थोडं थोडं तरी कळत होतं.'

मी म्हणालों, 'अरे, आज मी पाठ म्हणतों तो गीतेंतला आहे. ती भाषा संस्कृत आहे. ती तुला कशी उमगणार?'

तें ऐकून गेनू म्हणाला 'दादा, हें बरं दिसतं काहो तुम्हांला ? लोक गीतामाई गीतामाई असं म्हणतात तें कानांनीं ऐकलं आहे. ठाकूरद्वारच्या रामाच्या देवळांत तो पुराणिक गीतामाई वाचून सांगे. पण मला तें ऐकायला जायला कधींच फुरसत, फारशी हवीतितकी, मिळाली नाहीं. पण आतां तेंच गीतामाईचं नांव पुन्हां इथं निघालं. आणि आमच्या पुराणिकावाणी तुम्ही दिसत नाहीं म्हणा. तरी पण—'

'म्हणजे कसा रे' मीं मुद्दाम विचारलं थोडं खोंचून.

'म्हणजे असं, दादा, पुराणिकबुवा खरा पोटार्थी. त्याच्या गीतामाईचं त्याला थोडंच सुखसमाधान असल! पोथी वाचतांना पोथीपुढं कोण काय ठेवतं इकडं त्याचं लक्ष. आणि नुसता पुराणिक होऊन काय ती त्याची ऐट ? तो जरीचा रुमाल, नाहीं तर रेशमी झुळमुळ्याची पगडी. रेशमी हातरुमाल अन् बोटांतली—देव जाणं—खऱ्याखोट्या-हिऱ्याची आंगठी. सतरा वेळ पालथी मूठ तोंडाकड जायची ! मिशावरनं फिरायला. दादा, आम्हांला गीतामाई कळत नाहीं. पण आम्ही माणूस ओळखतों. म्हणून विचारलं, काय पाठ म्हणतां ? चार अक्षरं पोथीचीं सांगायला तुमच्यासारखाच पुराणिक बरा वाटतो.'

'अरे वा: तूं भाविक असून बराच चवकसहि दिसतोस. अन् खरं सांगूं का ? मी कांहीं पुराणिक नाहीं. पण कॉलेजांतला प्रोफेसर आहे. जन्म गेला संस्कृत शिकण्यांत-शिकविण्यांत. पण तुला जसा गीता सांगणारा तो पुराणिक आवडला नाहीं तशी, गीता शिकवायला तीं कॉलेजांतलीं पोरंहि मला कधीं आवडलीं नाहींत. फार चांगला तूं प्रश्न काढलास. तूं गीता समजावून घ्यायला तयार असलास तर मी कां नाहीं सांगणार—पण—पण शंका इतकीच आली कीं, तुला ती कशी सांगूं ?'

'नका, नका, दादा ती गीतामाई मला सांगायला तुम्हांला पाप लागत असल तर नका सांगूं.'—गेनबा तातडीनं म्हणाला.

'छेः छेः तसं नव्हे गेनबा' मी घाईनं म्हणालों : 'तुला गीता सगांण यांत पाप नाहीं तर उलट पुण्यच आहे. मूळ गीता आम्हा शिकल्या

लोकांपेक्षां तुम्हां न शिकलेल्यांना सांगण्याकरितांच आहे. पण गड्या माझं खरं पाप वेगळंच आहे.'

'तें कोणतं दादा'! गेनबा आश्चर्यानं म्हणाला.

'तुला ती गीता कशी सांगूं असं मीं म्हटलं ना आतां इतक्यांत'?

'मग त्यांत काय? मला समजेल तशी सांगा म्हणजे झालं.'. गेनू त्वरित म्हणाला, पण थोडं हंसूनहि म्हणाला.

'हां बरं बोललास.' मी म्हणालों 'तुला समजेल अशी सांगायला आजवर शिकलों नाहीं हेंच पाप बघ. आजवर कॉलेजांतल्या पोरांना गीतामाई दिखील परदेशी इंग्रजींतन शिकवली—संस्कृताच्या अधिकारी जाणत्या ब्राह्मण विद्यार्थ्यांनाहि ती इंग्रजींतून शिकविली हें माझं पाप! आणि तें पाप झालं असं तुझ्यासारखा भाविक बुद्धीनंहि कबूल करील.'

'मग घ्या ना दादा त्या पापाचं प्रायचित—आयतं चालून आलं तुमच्या पायाशीं तें—मला गीतामाईचीं चार अक्षरं मराठींत सांगून!'

'होय, गेनबा, काय सुंदर योग आला पण, अभावितपणानं. ठीक आहे. उद्यांचपासनं मी माझ्या पापाचं प्रायश्चित्त घ्यायला प्रारंभ करतों. बघूं तुला गीतामाई थोडीशी समजून सांगतां येते का मला. परीक्षाच आहे म्हणा. पण ती द्यायची हौस वाटते खरी. आणि माझा खरा परीक्षक तूंच ठरणार. कारण तुला न समजलं तर मी परीक्षेंत नापास! अपेशी ठरलों. तुला थोडंसं तरी समजूत पटेल असं मला सांगतां आलं—गीतामाईचं तात्पर्य—तर मी परीक्षा पास. आज आतां झोप सुखानं येईल. कारण उद्यांपासनं गीतामाई तुला सांगायचा आनंद मला लाभणार.'

इतकं बोलणं होऊन आम्ही त्या दिवशीं झोपीं गेलों.

## संवाद ४ था.

दुसरे दिवशीं मी गेनबाला म्हणालों ‘ गड्या, आज दिवस चांगला आहे. आपण गीतामाईला नमस्कार करून आरंभ करूं. पण प्रथम मला हें सांग कीं गीतेबद्दल तुला पूर्वीची काय माहिती आहे ? ’

‘ कपाळ, देवा, ’ गेनबा म्हणाला ‘ कुणी गीता म्हणतात, कुणी गीतामाई म्हणतात, कुणी ती रोजपाठ म्हणतात, कुणी त्या पोथीवरनं पुराण सांगतात. इतकंच माहीत आहे मला, आणि माझ्यासारखेच असतील आणखी कितीतरी अभागी लोक, दुसरे. ’

‘ बरं कृष्ण पांडव कौरव हे शब्द तरी तुला माहीत आहेत का ? ’

‘ होय दादा. कृष्ण तर देवच. गोकुळ अष्टमीचा उत्सव आम्हीं कोकणे लोक मुंबईंत करीत होतों. कोकणांतहि करतों. पांच पांडव, त्यांची द्रुपदी, ऐकून माहीत आहेत. कौरव कोण ते चांगलेसे माहीत नाहींत. पण दुर्योधन दुःशासन हीं दोन नांवं ऐकलीं आहेत. ’

‘ ऐक तर. फार जुन्या काळीं दिल्लीच्या वरच्या बाज़ूला—म्हणजे हस्तिनापूर कुरुक्षेत्र भागांत—कौरव पांडव हे दोघां राजांचे मुलगे बरोबरीचे चुलत भाऊ होते. त्यांच्यांत लहानपणापासनं भांडण होतं. त्यांचे स्वभावच वेगळे होते. त्यांतल्या कौरवांनीं कपटानं पांडवांना फार छळलं. वनवासाला पाठवलं बारा तेरा वर्षं. आणि परत आल्यावरहि राज्याचा हिस्सा देईनात, पांडवांच्या वाटणीचा. बरं मग सांग तो त्यांना कसा मिळावा ? ’

‘ कसा काय म्हणतां? युध करून. राज्य मिळायचं त्ये काय युधाशिवाय मिळतं दादा—आणि कुणाला तरी ? राजेलोकच भांडूं लागले तर त्यांचा न्याय दुसरा कोण करील ? ’

‘ ठीक सांगितलंस. ऐक तर पुढं. मग युद्धाची तयारी झाली. दोहों अंगं दोघांचे सगे-सोयरे, स्नेही, मांडलिक, मित्र, राजेरजवाडे, वीर, मोठमोठीं सैन्यें घेऊन, कुरुक्षेत्राच्या मोठ्या मैदानावर आले. इतक्यांत काय झालं ! पांडवांतला अर्जुन म्हणून होता मधला भाऊ. धनुष्य घेऊन

लढणारा पटाईत गडी वीर ! त्याचा रथ पुढं आला. आणि आतां हातघाई जुंपणार. तो इतक्यांत अर्जुनाला काय वाटलं कुणाला ठाऊक ! तो चमकला. त्यानं समोर चौफेर पाह्यलं, आणि रथाखालीं उडीच घेतली! त्याच्या रथावर बसला होता सारथी म्हणून कृष्ण, तुझा तो देव.'

'अन् माणसाच्या रथावर देव ? आणि तो कशाला दादा ?'

'हो, हो. तो देव आणि तो पांडव, हे आप्त होते. शिवाय मोठे मित्र होते. आणि देवानं अर्जुनाचा रथ हाकायचं पत्करलंच होतं युद्धप्रसंगीं.'

'अरेच्या, देव माणसाचा कोचमन, ड्रायवर, टांगेवाला ?'

'तसंच होतं तुझ्या देवाचं त्याच्या मित्रावर प्रेम. शिवाय रथ हाकायचं काम तुला वाटतं तसं तेव्हां हलकं नव्हते मानीत. रथ हाकणारा— सारथी म्हणत त्याला—रथांत बसून लढणाऱ्या सरदारा वीराइतका स्वतःहि मातबर असे. आणि ती एक मानाची जागा होती. कारण त्या काळीं रथांत बसून बाण मारण्याइतकं शहाणपण लागे, रथ हांकायला.'

'बरं मग ?'

'मग तो अर्जुन कृष्णाला म्हणाला, देवा, हे तर आपले भाऊबंद आहेत कीं सारे ! कुणी आजे, चुलते, काके, मेव्हणे, आप्त, गुरु, गुरुबंधु, आणि यांना मारायचं, यांच्याशीं लढून ? आणि तें कशाला ? तर राज्य मिळवायला ! 'ज़ळेना तें राज्य !' आणि असं म्हणून स्वारीनं धनुष्यबाण खालीं ठेवले कीं !'

'अन् मग ? युध कसं झालं ? पण दादा, मला हें मुळांत खरं नाहींच वाटत तुम्हीं आतां सांगितलं तें. अर्जुनाला हें सारं नातगोत काय आधीं माहीत नव्हतं ? अन् जसं कांहीं आयत्या वेळीं उमटलं ? कां कानांत सांगितलं जणुं कुणी त्याच्या ? खोटी गोष्ट. उगीच कुणीं कांहीं तरी रचली.'

'हं, तसं म्हणण्यासारखंच दिसतं, खरं हें चमत्कारिक. तरी पण पुराणांत—इतिहासांत तसं लिहिलं आहे ना ?'

'बरं मग काय झालं शेवटीं ?'

‘ मग त्या अर्जुन गड्याच्या मित्रानं, तुझ्या देवा कृष्णानं, त्या वेड्या अर्जुनाची समजूत घातली कशीतरी, अन् लढायला तयार केला झालं ! मग मात्र युद्ध झालं. कौरव मेले. पांडवांना जय आणि राज्य दोन्हींहि मिळालीं. ’

‘ मग अशा आडमुठ्या अर्जुनाची समजूत करणारा तो माझा देव कृष्ण मोठा हिकमती अन् चतुर असला पाहिजे, दादा ? ’

‘ होय, होता खरा तसाच तो ! तें असो. पण या गीतेंत काय आहे हें कळायला पाहिजे ना तुला ? तर तें हेंच कीं, शहाण्या कृष्णानं वेड्या अर्जुनाला कसा मोडून काढला अन् फिरून कसा घोड्यावर घातला ? ’

हा अज्ञानी शेतकरी या प्रचंड प्रश्नाचं उत्तर आपल्या स्वाभाविक आशिक्षित बुद्धीनं देणार याचा विचार येऊन, तें काय देणार देईल याविषयीं मला आश्चर्य व कौतुक किती वाटलं असेल, याची कल्पना तुम्हीच करा ! मी पुढं सरकून त्याला म्हणालों, ‘ सांग, सांग बरं गेनबा, तुला काय वाटतं तें ?

गेनबा म्हणला—

‘ मी सांगतो दादा कसं झालं असेल ते ! हासडल्या असतील चार शिव्या. थूः तुझ्या तोंडावर लेका ! लोक हंसतील त्याची कांहीं लाज ? मोठा वीर म्हणवतोस नाहीं का ? आतां नपूंसक म्हणून घ्यायला तयार हो ! कुळधरम बुडवायला, बापजाद्यांच्या तोंडाला काळोखी फासायला, निघालास ! असलं कांहीं म्हणाला असेल तो देव त्या वेड्या अर्जुनाला. ’

‘ तसं तर म्हणालाच रे. तो काय सोडतो मित्र झाला म्हणून ? प्रसंगच होता तसा आणीबाणीचा, मरामारायचा ! न्याय अन्याय याचा निकाल लावायचा! पण तुझा देव मोठा जाणता ज्ञानीहि होता हं ! त्याला सगळीं शास्त्रं तोंडपाठ होतीं. वादांत मोठा फर्डा. उगाच मोठं जाड जाड बोलून उलट्या गड्याला गोत्यांत घालणारा ! ’

‘ अस्सं का ? काय काय म्हणाला तो देव ? सांगा ना जरा. तें जाडं जाडं मला कसं समजणार म्हणा पण आपलं उगीच वाइस--’

' प्रथम तो देव असं म्हणाला ' अरे वेड्या अर्जुना, मारले तर मरतील म्हणून तूं शोक कुणाकरितां करतोस ? मुळीं कुणी मरतच नाहीं या जगांत. तूं काय, मी काय, हे कौरव काय, पांडव काय—पूर्वी कधीं नव्हतां असं कधीं तरी झालं होतं काय ? पूर्वी केव्हांहि होतां. आज तर आहांतच. आणि आज मरतील ते उद्यां, पुढं सर्वहि काळ, राहतील ! कारण मरतो तोच नाहीं का पुन्हां दुसऱ्या रूपानं जन्माला येत ? मग आज त्याला मारावं लागलं म्हणून काय बिघडलं ? हा देह गेला तर दुसरा मिळेलच कीं ! मरतं कोण सांगूं का ? माणसाच्या मनाशिवाय, आत्म्याशिवाय, बाकी सर्व जग मरतं. घर पडतं, मोडतं, जळतं. पण त्यामुळं घरांत राहणारा मरतोच असं नाहीं. आणि घर पडल्या मोडल्या जळल्यानं घर बांधणारा तर त्यांतल्या त्यांत मुळींच मरत नाहीं. येवढंच नव्हे तर सगळ्या जगाचीं घरं जो बांधतो तोच त्या त्या घरांत नेहमींच राहतो ! कायमचा ! एकदां इथं या पोषाखांत रूपांत दिसतो. एकदां तिथं त्या पोषाखांत रूपांत दिसतो. मग यांतला एक दुसऱ्याला मारतो म्हणावं काय ? आणि एकानं दुसऱ्याला मारलं असं एखाद्या सिनेमांतल्याप्रमाणं खोटं खोटं दाखवलं तरी हा मारीत नाहीं अन् तो मरत नाहीं. मग मारायला कां भितोस ? ' असं देव म्हणाला अर्जुनाला. '

' दादा, हल्लींच्या युद्धांत असं होत असल खरं. इतक्या दुरून लढाई चालती कीं, मारणारा आणि मरणारा एकमेकांना मुळीं दिसतच नाहींत. तेव्हां म्हणावं कीं खुशाल, हा त्याला मारीत नाहीं अन् त्यानं मारल्यानं हा मरत नाहीं. पण, दादा, तुम्ही सांगता या गीतेंतल्या लढाईत समोरचीं माणसं तर डोळ्याला दिसत होतीं ! नव्हे चांगलीं ओळखूं येत होतीं ! तिथं असं कसं म्हणतां आलं असतं कीं, हा मारीत नाहीं तो मरत नाहीं.'

' तूं म्हणतोस तें खरं आहे कीं, त्या पुराणांतल्या लढाईत मारणारा मरणारा दोघे एकमेकाला समोरासमोर चांगले पाहूं शकत होते. पण समज, त्या सर्वांचा आत्मा एकच असला तर मग कसं ? कोण मारणार ? कोण मरणार ? '

‘ सर्वांना आत्मा एक असतो ? अन् तो कसा दादा ? ’

‘ हं. सांगतों बघ. तूं आरशापुढं उभा राहिलास म्हणजे एका गेनबा-ऐवजीं दोन दिसतात ना ? ’

‘ होय दादा. ’

‘ तूं त्या दुसऱ्या गेनबावर हात उगारलास, मूठ वळवलीस म्हणजे तोहि तसंच करतो ना ? आरशावर तुम्हां दोघांचे हात एकदम पडतात ना ? ’

‘ होय दादा. ’

‘ झालं तर. रूप आकृति दोन. पण माणूस एकच ना ! बरं, तूं नदींत उभा राहून कांठच्या डोंगराकड तोंड करून—किंवा दगडी देवळाच्या गाभाऱ्यांत उभा राहून—‘ कोण तूं ? लुच्या हरामखोर ’ म्हटलंस तर तिथं दुसरं कुणी दिसत नसतां, तुझ्याच शब्दांनीं शिवी देऊन, कुणी तरी उलट तुला हट-कतं ना ? मग आवाज दोन पण माणूस एकच ना ? तसंच हें आहे बघ. आरशापुढं पाहिलं तर वाटतं दोन माणसं, देवळाच्या गाभाऱ्यांत बोललं तर वाटतं दोन माणसं, पण मुळांत एकच ना ? तसं देव अर्जुनाला म्हणाला, तुम्ही पांडव आणि ते कौरव एकच आहां. मार, अन् बघतोस काय ? ’

‘ अन् यानं समजूत पडली अर्जुनाची, दादा ? आरशांत दिसतो तो गेन्या खरा नसतो दादा. आरशांत आपणच आपणाला दिसतों हें माणसाला कळत कां नाहीं ? तो आरशांत पाहून हंसेल, पण त्याला हांक मारून हटकणार नाहीं. तसंच हा कोण तोतया गेना, असं म्हणून रागावून त्याच्या अंगावर हात उगारणार नाहीं. लहान मुलानं आरशांत पाहिलं तर तें पुढं तोंड करतं पण त्याला चावायला नाहीं, तर त्याचा मुकाच घ्यायला ! ’

‘ पण चिमणी आरशावर बसलेली कधीं पाहिली आहेस कीं नाहीं ? ती काय करतेरे ’ ?

‘ हां ती वेडी. ती मात्र भांडण उकरून काढून ही कोण परकी

चिमणी म्हणून तिला चोंच मारायला धांवते खरी. पण चिमणीचं तरी मन कुणी खरं ओळखलं? बरं, ही चिमणी आरशांतल्या चिमणीला मारायला उठली तरी ती काय तुम्ही सांगतां असला येदांत ऐकून ? नाहीं मुळींच. आपण नि ती चिमणी एक आहों असं तिला वाटतच नाहीं. आपण दोन वेगळया आहों असं वाटतं म्हणूनच ती भांडायला उठती!'

'शाबास गेनबा. तुझी शंका अगदीं बरोबर आहे. पण तो देव मग काय म्हणाला, तुझ्या म्हणण्याप्रमाणंच, अर्जुना, समज, माणूस वेगळा वेगळा आहे, तो जन्मतो आणि मरतो. कबूल. पण मरत नाहीं असा कोणी तरी आहे का? नाहीं. झालं तर. कौरव जन्मले ते केव्हां तरी मरायचेच आहेत. मग आजच मेले तर कायरे बिघडलं? आणि ते मरणारच तर तूंच कां नाहीं मारीत? आणि माणूसच काय? पण जगांत मरत नाहीं, नासत नाहीं, नाहींसं होत नाहीं असं कांहीं तरी आहे काय? मग माणूस मेल्याबद्दलच तेवढं कां वाईट वाटावं?'

'हं, दादा, हें मात्र अर्जुनाला अधिक पटण्यासारखं दिसतं. पण देव तरी पहा मतलबी कसा तो! पहिल्यान्दां म्हणाला कुणी मरतच नाहीं. मग म्हणाला केव्हां तरी मरायचाच तर तूंच मार ना. वरती राज्य मिळेल, कीर्ति मिळेल. पण, दादा, कौरव आपल्या मरणानं केव्हां तरी मरायचे तरी लोकांचा जीव घेणं हें अर्जुनाला पाप नव्हतं का वाटत? काय सांगता गोष्टी? माझ्या शेतांतलं झाड उद्यां केव्हां तरी वाळायचं मरायचं आहे असं खरं असलं, तरी उद्यां काय नि आज काय सारखंच, असं म्हणून कंबरे-येवढं लहान किंवा फळंफुलं धरणारं झाड मी तोडीन होय? आतां मीहि जितं झाड तोडीन, पण तें फळफुलं न देतां पिकांवर भाजीपाल्यावर विनाकारण सावट करीत असलं, आपल्या सावलींत कांहीं उगवूं वाढूं देत नसलं तर तोडीन. पण तें माझ्या पिकाचा भाजीपाल्याचा शत्रू म्हणून. तें झाड, आणि तें फळ झाड भाजीचं रोप, दोन्ही एकच म्हणून नव्हे कांहीं. जितं झाड बागेंत परकं आणि खराब वाटलं नाहीं, तर काय म्हणून तोडायचं? असंच वाटलं असल अर्जुनाला.'

‘ वाटत होतं तर ! म्हणून अर्जुन जागचा हलेना. मग येवढ्यानं अर्जुन बधत नाहीं असं पाहून देव म्हणाला—अर्जुना, तूं क्षत्रियाचा बच्चा ना ? कौरवांनीं तुमचं राज्य घेतलं हा अन्याय कीं नाहीं ? आणि आपणाला झालेला काय, लोकांना झालेला काय, अन्याय हटवायचा हें तुझं काम नव्हे का—क्षत्रियाचं ? राज्याचा हिस्सा नाकारणं हा अन्याय नव्हे कां ’ ?

‘ होय, दादा, म्हणूनच मी म्हणतों कीं अर्जुन युधाला आधीं उभा राहीना हें म्हणणं तरी खोटं, नाहीं तर त्या कृष्णाचा तो जाडा जाडा येदांत एकून खात्री पटून युधाला सटकला हें तरी खोटं. पण घरचा हिसा नि भाउबंद देत नाहीं, मग काय युधच. ’

‘ बरोबर. पण अन्याय म्हटला आणि तो स्वतः आपणाला नाही, पण दुसऱ्याला झाला, तरी एकच. ’

‘ त्ये नाहीं कळलं कसं तें. जरा समजून सांगाना ’ ?

‘ समजना, गेनबा, तुझ्या देखता एखादा पापी तरुण एखाद्या गरीब बाईच्या अंगावर हात टाकतो आहे आणि ती ओरडते आहे. मग हा अन्याय तूं चालूं देशील ? ’

‘ हें तुम्हीं ठीक बोललां. नाहीं, कधींहि नाहीं चालूं द्यायचा. ’

‘ मग हा तुझा केवळ धर्म म्हणूनच तूं करशील ना ? ’

‘ होय दादा. तो माझा धर्मच नव्हे का ? ’

‘ आणि हा अन्याय हटवितांना तो चंडाळ मेला तर ? ’

‘ मरेना लेकाचा ! ती त्याला शिक्षाच होईल कीं. आपल्याच मरणानं मेला असं मी म्हणेन ! ’

‘ आणि गेनबा, तूंच झटापटींत मेलास तर रे ? ’

‘ काय फिकीर ! मी देवाघरीं जाईन. अन् लोकहि म्हणतील वारे मर्द गडी, आमचा गेना ! ’

‘ आणि समज—आपलं उगाचच म्हणतों हां—तूं त्या बाईला न सोडवतां भिऊन पळून गेलास तर ? ’

‘ तर काय ? मग मी तोंड कसं दाखवीन लोकांना ? थुकतील ना ते त्याच्यावर ! ’

‘ पण एक विचारायचं राहिलं अजून गेनबा ! तूं धर्म म्हणालास खरा. पण त्या झगड्यांत पडतांना तूं जिंकशील कीं तो जिंकील, म्हणजे तूं जिंकशील कीं हरशील, याची खात्री दुसरा कुणी आधीं तुझी करून देईल का ? किंवा तुझी तरी आधीं होईल काय ? ’

‘ काय दादा विचारतां ? डोकं धरून असा विचार करीत बसेल तो मुडदा जागचा हलेल कशाला ? छे दादा, धर्माचं काम तें धर्माचं काम. त्यांत हारजित कांहीं कांहीं का होईना ! माझं काम हातांत दांडकं घेऊन उठायचं ! त्या पाप्याला सटकायचं आणि त्या बाईला सोडवायचं.’

‘ अगदीं बरोबर, देवानं अर्जुनाला शेवटीं हेंच अस्संच सांगितलं बघ.’

‘ मग हें आधींच सांगायचं कां नाहीं सुचलं ? मर्द गड्याच्या धर्माचं काम म्हणालां तें पटलं असल खरं त्या अर्जुन्याला ! उगाच त्ये दुसरं भारूड कशाला सांगितलं ? म्हणे मरत नाहीं म्हणून मार. म्हणे मरणारच म्हणून मार. उलटं अन् सुलटं एकच दादा ? बरं मग हें दुसरं तरी ऐकून निघाला का अर्जुन लढाईला ? संपली का गीता यावर ? ’

‘ नाहीं, थोडं बिघडलं—देव पुढं सहज म्हणून गेला कीं ‘ अर्जुना, धर्माचं काम करावं पण त्याचं फळ काय मिळेल हें पाहूंच नये.’ तेव्हां अर्जुन म्हणाला ‘ कौरवांना मारीन आणि राज्य मिळवीन. पण कौरव मरायला हवे ते मरतील—राज्य हवं तें मिळेल—म्हणजे हें फळ पदरांत पाडून घेईन, असं वाटत असेल तरच हात पडेल ना धनुष्यावर ? तें फळ पदरांत पाडून घ्यावंसं वाटतं म्हणूनच हात उचलीन. पण या फळाची खात्री न वाटली तरी मुळांतली आशा–इच्छा कशी सुटणार ? ’

‘ खरं तें बोलला अर्जुन, दादा. असं बघा दादा, मी जमीन नांगरतों, बीं पेरतों, पाटाचं पाणी लावतों, हें सगळं करतों तेव्हां, उद्यां माझं पीक उभं राहील, तें कापून घरांत भरीन, आणि तें शिजवून खाईन, ही इच्छा मनांत असते म्हणूनच मी दिवस रात खपतों. ती इच्छाच नसली तर

कसा खपेन? मगाशीं बाई माणसाची अब्रू वांचवायला हातांत दांडकं घेऊन उठेन, आणि जीवहि जाईना का देईन, असं म्हटलं त्यांत सुद्धां फळ होतं हां डोळ्यापुढं—एकच कां दोन फळं?'

'तीं कोणतीं गेनबा?'

'एक फळ त्या बाईची अब्रू वांचवायचा उपकार. आणि दुसरं फळ 'वाहवा गेनबा शाबास' असं लोक म्हणतील तें ऐकायला व पाठ थोपटून घ्यायला मिळेल ती मिळावी हें. आतां घरच्या शेतीचा उद्योग करण्यांत मात्र अगदीं तशीं दोन फळं नाहींत दादा! लोकांनीं बरं म्हणावं म्हणून मी मेहनत करीत नाहीं, तर पोट भरायला मिळावं एवढं एकच फळ. पण तें तरी असतं डोळ्यापुढं. पण, दादा, हें सुद्धां फळ मनांत धरूं नको म्हणालांत तर तें कसं होईल?'

'ठीक बोललास. पण माणसानं जगांत शिकायचं असतं तें नक्की हेंच बघ. शिकल्याशिवाय तें येणार नाहीं हें खरं. पण त्याकरितां शिकलं पाहिजे. फळाची इच्छा धरल्याशिवाय उद्योग होत नाहीं सहसा, हें ठीक आहे. ती जगाची रीतच आहे. तो माणसाचा स्वभावच आहे. पण या फळाची इच्छा न धरणं एखाद्याला साधलं असं समज. हो, कल्पना कर आपली—त्याला वेडा म्हण, माणसावेगळा, जगावेगळा, माणसांतने उठलेला म्हण—काय हवं तें म्हण—पण, तो तुझ्याहून अधिक चांगला असं मनांत तरी म्हणशील कीं नाहीं?'

'त्याला भला कां म्हणावं तें अजून डोक्यांत भरत नाहीं दादा.'

'सांगतों कसं तें. तूं शेतीची मेहनत करतोस पिकाची इच्छा मनांत धरून हें कबूल. पण तुझी शेती, मेहनत केलीस तरी, पाऊस पडल्याशिवाय पिकेल काय?'

'नाहीं ना?'

'पण आभाळांतन खालीं पडतांना तो पाऊस कोणती तरी स्वतःविषयीं इच्छा मनांत धरतो का? तुझं पीक त्याला खायचं नसतं. त्याच्या पोटाला पाणी हवं तें साभिंदर त्याला देतो. तूं देत नाहींस. येऊन जाऊन तुझ्या

शेतावर पडणाऱ्या पावसाला तूं शाबासकी देशील, स्तुति करशील, पण ती त्याला ऐकायलाहि येत नसेल. एवढंच काय? रात्रीं पाऊस पडतांना तो पहायला तूं जागा असलास तर एक वेळ तुझी शाबासकी त्याला ऐकायला तरी जाईल. पण असंहि नाहीं का होत कधीं ? कीं तूं रात्रीं झोप काढलीस आणि सकाळीं उठून पाहतोस तों आपलं शेतांत पाणीच पाणी ! तें पाहून तूं पावसाला शाबासकी दिलीस तर ती ऐकायला तो जागेवर असतो कुठं तेव्हां ? मग काय त्याचा पत्ता काढून खत धाडून त्याला शाबासकी कळविणार ? कीं तार करून ? '

' हें नव्हं दादा. भलत्याचा दाखला भलत्याला ! पावसाला का कुठ जीव आहे, मन आहे, माणसासारखं ? म्हणून माणसासारखी त्याला आपली स्तुति ऐकायला मिळेल, किंवा ती ऐकायला मिळण्याची तो इच्छा करील ? '

' वा: रे गड्या ! पावसाला जीव नाहीं काय? एरवीं तो इतक्या मजला करून पाणी ओतीत जाण्याचं काम करील जगभर ! आणि तूं एक वावरभर शेती करणारा, तुला मात्र जीव आहे काय ? तात्पर्य काय, मनांत स्वतःकरितां फळाची इच्छा न धरतां काम करणं असं कांहीं देवाच्या दुनियेंत आहेच कीं नाहीं ? पावसाच्या उदाहरणावरन तुझ्यापेक्षां पाऊस भला कीं नाहीं ? '

' असेल. पण तें भलेपण माणसाच्या अंगीं कसं येणार ? '

' हें बरं बोललास. पण प्रयत्न केल्यानं येतंहि. आणि तो प्रयत्न कसा करितां येईल हेंच तुझ्या देवानं त्या अर्जुनाला मग समजावून सांगितलं. तें पहिलं सोडून दिलं निवळ वेदांती बोलणं. '

' पण दादा, पाऊस परोपकारी आहे. तो केवळ उपकार करावा म्हणून पाणी पाडतो. कुणी शाबासकी द्यायची वाट पहात नाहीं. इच्छा ठेवीत नाहीं. हें सारं खरं. पण तो देव आहे. निदान माणूस नाहीं. माणसासारखं त्याला पोट भराय करतां राबावं लागत नाहीं. त्याला स्वतःचं कुटुंब नाहीं. मुलंबाळं नाहींत. त्याला देवानं कामच लावून दिलं आहे दुसऱ्यावर उपकार करायचं. पण त्याचा दाखला माणसाला देऊन काय उपयोग ?

माणसालाहि देवानं पावसासारखं करावं, अन् घ्यावं त्याच्या हातनं नुसतं परोपकाराचं काम ? '

'मग तुझं म्हणणं काय? देव नसणाऱ्या माणसानं काय करावं म्हणतोस ? '

'माणसानंहि हातून होईल तसा, होईल तेव्हां, परोपकार करावा कीं ! आपण दानधर्म करतोंच की गरीब असूनसुद्धां. पण तें केव्हां केव्हां. पण रोजच्या आणि सगळयाच कामांत दुसऱ्यावर उपकार करीत जा म्हटलं तर तें कसं होईल त्याच्या हातनं? आन् तुम्ही तर त्याच्याहि पलीकडं जातां कीं ? '

'तो कसा रे ? '

'असं कीं, जिथं परोपकार करायचा नसतो तिथंसुद्धां काम कर, पण फळ पदरांत पाडून घ्यायची इच्छा मात्र ठेवूं नको असं तुम्ही म्हणतां! तुम्ही म्हणतां म्हणजे त्या देवा कृष्णानं त्या अर्जुनाला म्हटलं असं सांगतां. पण मी म्हणतों असं कसं होणार ? '

'तें कां बरं ? '

'तें असं बघा! दादा, भूक भागायकरतां मी जेवतों; पण तुम्ही म्हणणार 'जेव. पण भूक भागायकरतां जेऊं नको'. मग काय अजीर्ण झालं तर वाढवायला जेऊं? मी तहान भागायला पाणी पितों नव्हे का ? पण तुम्ही म्हणणार, 'पाणी पी पण तहान भागण्याकडं पाहूं नको.' तहानेबिगर तोंडाला कोण पाणी लावील बरं ? झाडावर आंबा पिका दिसला, म्हणून मी तो पाडायला दगड मारतों अन् तो पडला म्हणजे घेऊन खातों. पण तुम्ही म्हणणार, 'दगड मार, पण आंबा पडतो कीं नाहीं यावर लक्ष देऊं नको. मग काय तो पडला तरी आणखी दगड मारीतच बसूं? किंवा असं? आंबा नसलेल्या फांदीवरहि नेम धरून दगड मारूं? बागेला मोटेचं पाणी पाजतों तें भाजी उगवावी पोसावी म्हणून. फुलझाडांना फुलं यावीं म्हणून. पण तुम्ही म्हणणार कीं, 'बाग

नसली तरी मोट धरून पाणी पाजीत जा. आणि फळं आलीं तर काढूं नको!' तसं करूं लागलों तर मला लोक वेड्यांत काढतील नव्ह का?'

'अरे लोकच कां? तसं केलंस तर मी सुद्धां तुला वेडा म्हणेन. बाग उभी आहे, तींत फळझाडं फुलझाडं आहेत तरच तूं मोट धरावी, असं मी म्हणेन. मोट धरावी. पाणी लावावं. मशागत करावी. फळंफुलं काढावीं विकावीं खावीं. यांत कांहींच चुकलं नाहीं. वाटलं तर तूं आपण खाण्या-बरोबर दुसऱ्यालाहि चार फुकट दे. वाटलं तर न दे. पण समज, या फुलाफळांचा इतका ध्यास तुला लागला कीं, एक साल फळंफुलं आलीं नाहींत, म्हणून तूं वैतागून जीव द्यायला निघालास तर तें ठीक होईल का?'

'छट् असं कुठं झालंय दाद्दा? एक वर्ष नाहीं आला फळाफुलांना भार—चाललंच आहे कीं—हवा आहे, रोगराई आहे—नव्हे, फळंफुलं आलीं पण बाजारांत भावच इतका पडला कीं, फुकटावारी ओपावीं लागलीं. तरी मी जीव देईन होय? कधीं नाहीं देणार. मनांत म्हणेन यंदांचा वचपा पुढच्या वर्षीं काढीन अन् पुन्हां मोट जुपीनच.'

'बरं आतां उलट उदाहरण घेऊं हं. समज फळझाडं फुलझाडं इतकीं घरलीं फुललीं कीं तीं वाहून आणायला गडी गाडी पुरे पडेना, आणि बाजारांत भावहि असा आला की एकेकाच्या ठिकाणीं चार चार रुपये आले, तर तूं आनंदानं इतका वेडा होऊन जाशील का, कीं आपला गाणं गात सुटला आहेस, डोक्यांत फुलांचे तुरे खोवून नाचतो आहेस, परक्या बायकांचा अपमान करतो आहेस,'—

'नाहीं, दादा, तसंहि नाहीं होणार कांहीं माझ्या हातनं. मनांतल्या मनांत आनंदी राहीन, पण त्यामुळं बाहेर काय वेड्यासारखा वागेन?'

'अगदीं बरोबर. तर मग लाभ झाला म्हणून तूं फार आनंद मानणार नाहींस, आणि हानि झाली म्हणून फार दुःखहि करणार नाहींस. तर मग काय करशील?'

'काय करायचं? रोजचं काम, देवानं दावलं अन् संसारानं लावलं,

तें काम करीत राहीन. सकाळीं गुरं रानांत सोडायचीं, गोठा करायचा, मोट धरून गुरांना अन् शेतमळयाला पाणी पाजायचं, जमीन नांगरायची, गवतकाडी भरून घ्यायची, अंघोळ करून देवावर फूल वहायचं, जेवायचं, घरीं आल्यागेल्याला गुळपाणी द्यायचं, शेजारच्या पोरांबाळांना खेळवायचं, अन् कुणाशींहि दोन गोड शब्द हंसून खेळून बोलायचं,— हेंच नित्याचं काम. तेंच करीन. मग मोठा सुकाळ असो नाहीं तर मोठा दुकाळ असो.'

'बरं, एखाद्या रात्रीं डुकरांची धाड आली मळयाबागेंत, तर चार लोक जमवून, हत्यारपात्यार घेऊन, त्या जनावरांना हुसकायला मारायला निघशील कीं नाहीं ? तें अगदीं रोजच नसलं तरी मधून मधून येणार—वर्षांतलं सहामाहींतलं पण नित्याचं काम म्हणालास तसलंच कीं नाहीं तेंहि ?

'होय दादा, तेंहि नित्याचंच काम म्हणा कीं. केव्हां केव्हां, पण कराया हवंच.'

'आणि हीं सगळीं कामं करायचीं तूं टाकून दिलींस फार वैतागानं नाहीं तर आनंदानं, तर ती तुझी चूकच होईल कीं नाहीं ? '

'अगदीं खरं बघा, दादा.'

'अस्सं, तर तुझ्या कृष्णदेवानं अर्जुनाला असंच सांगितलं बघ. तो म्हणाला, 'शत्रु उठला नाहीं तोंवर सुख शांतपणा मैत्री प्रेम आहेच. पण युद्धाचं जुपलं तर लढलं पाहिजे. मारलं पाहिजे. म्हणून कौरवाशीं लढ.'

'हें ठीक सांगितलं कीं त्या देवानं. आणि मी म्हणेन अर्जुन वठणीवर यायचा तसा, आड रानांत शिरणारा येदांती देवहि वठणीवर यायला हवा होता तो आला, बरं झालं ! पण एक मळमळ राहती दादा अजून मनांत. मी कधीं सुखासुखी कुणा प्राण्याला मारीत नाहीं. कुणाचा जीव घेत नाहीं. विंचू साप दिसले तर त्यांना मारतों. कारण चुकून माणसाचा हात पाय लागला तरी ते चावतात.'

'बरोबरच आहे. चुकून हातपाय लागला माणसाचा कीं मुद्दाम द्वेषबुद्धीनं, हें साप विंचवांना कसं कळणार ? आणि चुकून हातपाय

लागला तरी आपणावर हल्ला झाला, आपण मरूं, असं त्यांना वाटतं म्हणून ते चावतात. उलट चावण्याशिवाय त्यांना आपलं रक्षण करण्याला दुसरं साधन काय असतं? त्याचा वेळींच उपयोग करावा म्हणून ते चावतात.'

'तें खरं. आणि आपणाला नाहीं तर दुसऱ्या कुणाला तरी ते चुकून चावणार असं वाटून मी त्यांना मारतों. पण खरं सांगूं दादा, ते प्राणी मेल्यावर त्यांच्याकडं पाहून वाईट वाटतं. पाप केलं असंच वाटतं.'

'ठीक. आणि तुझ्या अंगावर विनाकारण वाघ अस्वल धावून आलं आणि त्यांना तूं मारलंस, तरी पाप केलं असं वाटलं का तुला?'

'नाहीं दादा, आपला जीव वांचवायचा हक्कच नाहीं का देवानं दिला ज्याला त्याला? म्हणून दुसरा आपणाला मारणार तों त्याच्या आधींच आपण त्याला मारलेलं बरं नव्हे का? देवानं सगळ्यांचीच दुष्टबुद्धि एकदम काढून घ्यावी ती बरी. ती तो काढून घेत नाहीं, काय करावं? पण ती काढून घेईपर्यंत हें असंच चालायचं. ज्याला त्याला आपला जीव प्यारा वाटतो खरा, दादा.'

'म्हणजे मग एकंदरींत असं झालं नव्हे का? आपणाला मारायला कुणी आला तर त्याला मारणं चूक नाहीं. आपणाला मारायला म्हणून आला नाहीं, पण तो दुसऱ्या कुणाचा किंवा आपलाहि चुकून तरी घात करील असं अज्ञानानं वाटलं तर त्याला मारणं हेंहि, थोडसं चूक असलं तरी, तितकसं चूक नाहीं. मात्र यांपैकीं कांहीं नसतां उगीच, आपल्या करमणुकीखातर स्वार्थाखातर दुसऱ्याला मारणं हें तेवढं चूक. असंच ना?'

'होय दादा, हें तुमचं बोलणं सगळं पटलं. पण तें पहिलं? आडरानांत शिरून बोललेलं? कौरव आणि पांडव दोन नाहींत म्हणूनच मार असं अर्जुनाला अडाणी सांगायची बुद्धि कशाला झाली देवाला? घ्यावं लागलंच कीं तें आपलं म्हणणं परत? आणि हें दुसरं परकेपणाचं बोलणं मात्र शेवटीं पटलं कीं नाहीं अर्जुनाला? म्हणावं लागलच कीं देवाला 'बरं अर्ज्युन्या! हें म्हणणं पटत नाही तर दे सोडून. येदांत नको तर

राहायला. पण तूं मर्द गडी. तुझं राज्य तुला देत नाहीं म्हणतो हा अन्याय. मग घे तें युध करून. तूं क्षत्रियाचा बच्चा म्हणून लढणं हा तुझा धर्म हें तरी लक्षांत ठेव. अन् लढ. असं देवाला म्हणावं लागलं. तें मात्र पटलं. म्हणून निघाला अर्जुन युधाला. कांहीं म्हणा, हिकमत चुकली खरा थोडीशी माझ्या देवाचा बी ! जशाला तसंच सांगायला हवं.'

## संवाद ५ वा

दुसरे दिवशीं गेनबा माझ्या आधींच येऊन आपल्या जागेवर बसला होता. आणि मी येतांच 'या दादा' असं म्हणून त्यानं कालच्या-पेक्षां आज अधिक उत्सुकतेनं माझं स्वागत केलं. त्यावरून मला असं वाटलं कीं, आमचं कालचं संभाषण त्याला आवडलं असावं. पण त्याच्या मनांत कांहीं तरी शंकाहि उपस्थित झाली असावी. कारण मी बोलण्याची वाट न पाहतां तो आपण होऊन मला म्हणाला 'दादा, काल तुम्ही फार चांगलं सांगितलं पण—'

मी म्हणालों, 'अरे वा: ! मीं तर तुला नसते प्रश्न विचारिले, आणि तूंच खरोखर त्यांचीं उत्तरं फार चांगलीं दिलींस. मग 'पण' काय ?'

गेनबा म्हणाला, 'तें काय की दादा ! पण मला थोडी शंका यती. विचारूं का ?'

मी म्हणालों, 'विचार कीं, तूं आणि मी कांहीं दोन नाहीं. तुझं माझं मन मी एकच समजतों. तेव्हां मीं तुला काल प्रश्न केले तसे तूं मलाहि करण्याचा अधिकार तुला येतोच कीं.'

गेनबा थोडा विचार करून म्हणाला, 'असं पहा दादा, त्या देवा कृष्णानं त्या अर्जुनाशीं एवढा घोळ कशाला हो घातला ? आणि आड-रानांत शिरून वळसे घेऊन कशाला हो बोलला ?'

मी म्हणालों, 'मग तुझ्या मतं त्यानं काय करायला पाहिजे होतं ?'

गेनबा म्हणाला, 'दादा, वेड्याची समजूत असं सरळ बोलून कधीं निघत नाहीं. मी सांगतों, मी त्या देवाच्या जागीं असतों तर काय केलं असतं तें.'

गेनबाचं हें धिटाईचं उत्तर ऐकून मला नुसता आनंदच काय पण हर्ष झाला म्हणाना. मनांत म्हणालों, 'माणसाची स्वाभाविक बुद्धि म्हणून असते ती ही अशी.' मग त्याला म्हणालों, 'सांग सांग बरं गेनबा. तूं त्या अर्जुनाला काय बोलला असतास तें.'

गेनबा म्हणाला, 'अर्जुन सरळ धनुष्यबाण घेऊन लढायला लागायचं सोडून आड रानांत शिरला असं पाहून मी लबाडीनं म्हणालों असतों, 'अर्जुना, तुझंहि म्हणणं ठीक आहे. गड्या, या आपल्या आप्तांना मारून कुळाचा संहार करून काय करायचं आहे ? मीं रथ थांबविलाच आहे. त्यांत धनुष्यबाण ठेऊन दे. सरळ कौरवांच्या सेनेकड जा. भीष्म द्रोण यांच्यापुढें लोटांगण घालून नमस्कार कर आणि म्हण कीं, मी कांहीं युद्ध करीत नाहीं—तुम्हींच हें राज्य घेऊन आपल्या हातानं कौरवांना द्या. मी जाईन कुठं तरी अरण्यांत निघून. आणि तपश्चर्येंत जन्म सफळ करीन.'

'बरं, बरं' मी हंसून म्हणालों. 'तूं अपूर्वच सांगितलंस खरं. पण मग पुढं काय झालं असतं असं तुला वाटतं ?'

गेनबा म्हणाला, 'भीष्म द्रोणांनीं अर्जुनाला वर उचलून घेऊन प्रेमानं आलिंगन दिलं असतं. पण कौरव ते कौरव. दुर्योधन तो दुर्योधन. त्याला वाटलं असतं आमचं हें मोठं सैन्य पाहून अर्जुन गर्भगळित झाला आहे बरं का ? म्हणून शरण आला. पण असं म्हणून कौरव त्याला इतक्या मोठ्यानं हंसले असते, कीं अर्जुनाला अपमानाची तिडीकच उठली असती. किती केलं तरी तो पडला जातिवंत क्षत्रिय. अशा अपमानाचा घाव वर्मी लागला तर तो कसा सहन करील ?'

‘ बरं बरं.’ मी उत्सुकता दर्शवून म्हणालों. ‘ मग आणखी पुढं काय झालं असतं ? ’

गेनबा म्हणाला, ‘ दुसरं काय व्हायचं ? अर्जुन रागानं तडक परत आला असता. त्यानं हातांत धनुष्यबाण घेतलं असतं. आणि लढायलाच सुरवात केली असती. मग तो देव नको म्हणता तरी थांबला नसता.’

मी म्हणालों, ‘ होय गेनबा, असंहि झालं असतं खरं. पण देवानं दुसऱ्या एका रीतीनं त्याची समजूत काढली त्यांत तरी काय चुकलं ? ’

गेनबा म्हणाला, ‘ मी, आणि देवाला चूक म्हणणार ? पण आपलं माणूस माणसाशीं बोलतं म्हणून म्हणतों हां ! असं पहा, दादा, देवानं समजुतीकरितां म्हणून अर्जुनाला जें सांगितलं त्यानं माझ्यासारख्याची देखील समजूत पटली नसती. कसं तें पहा. देव म्हणाला, ‘ अरे, हे कौरव आधीं मेलेलेच आहेत. मग त्यांना मारायला तुला कां वाईट वाटावं ? ’ त्यावर मी म्हणालों असतों, ‘ कौरव जर आधीं मेलेलेच आहेत तर मीं आणखी मारले काय नि न मारले काय सारखंच कीं नाहीं ? ’ देव म्हणाला, ‘ तूं न मारलेस तरी काळ त्यांना केव्हां तरी मारीलच. मग तूंच कां नाहीं मारीत ? ’ त्यावर मी म्हणालों असतों, ‘ त्याला काळ मारील तर आयतं बरं झालं कीं परस्पर. मीं मारून नसतं पाप डोक्यावर कशाला घेऊं? ’ देव म्हणाला, ‘ कौरव मेले तरी पुन्हां जन्माला येतील त्यांत काय मोठंसं ? आत्मा कीं काय तो फिरून जन्माला येतोच कीं ? ’ त्यावर मी म्हणालों असतों, ‘ एकदां मीं मारून कौरव कायमचे मेले असते तरी ठीक होतं. पण मी आज त्यांना मारायचं, आणि फिरून कुणाच्या तरी पोटीं त्यांनीं पुन्हां जन्माला यायचं. या खटाटोपांत काय अर्थ ? ’ देव अर्जुनाला म्हणाला, ‘ तुझा आणि त्यांचा आत्मा एकच आहे. ’ त्यावर मी म्हणालों असतों, ‘ दोघांचा आत्मा एकच तर एका शरीरानं दुसऱ्या शरीराला कां मारावं ? ’ म्हणजे थोडक्यांत सांगूं, दादा, माझं म्हणणं ? तें असं कीं, असल्या वेदांताच्या भारी मोठ्या गोष्टी तुमच्या गीतेच्या पोथींत कुणीं काय लिहिल्या असतील त्या असोत. पण त्या लढाईच्या वेळीं,

एखाद्या देवळांतल्या पुराणिकासारखं बोलाचालायला, वेळ तरी कुठं असणार ? आणि सुचणार तरी कुणाला ? अर्जुनाला एका क्षणभरचं वेड आलं असेल कीं ! शहाण्याला सुद्धां एखाद वेळ वेडंपण आठवतं. पण तें किती ? अगदीं क्षणभर. पण पांडवांचं आणि कौरवांचं वैर जन्मभर होतं तें कोण कसं विसरणार ? समजुतीची गोष्ट सुचायची तर त्याला आधीं वेळ पुष्कळ होता कीं. एवढं सैन्य जमवलं. समोरासमोर येऊन ठाकलं. आणि अशा वेळीं म्हणं सुचला येदांत. असं कुठं साऱ्या जगांत कधीं तरी झालं आहे का ? कुणीं तरी पाहिलं ऐकलं आहे का ? आतां क्षणभर वेड सुचलं त्या अर्जुनाला, तर त्याचा मैतर देव कृष्ण जवळ होताच. त्यानं अर्जुनाच्या झोकानं प्रथम थोडं घेऊन मग मुद्यार्ची कानगोष्ट केली आणि ती अर्जुनाला पटून तो लढाईला तयार झाला, येवढं मात्र खरं. अर्जुन क्षणभर येदांती बैरागी झाला त्याच्या तोडीला तोड म्हणून देवानंहि क्षणभर येदांताची पोथी सोडली झालं. पण अर्जुनाची नस खरी कुठं दाबायची हें देवाला पुरं माहीत म्हणून त्यानं लगेच ' तूं क्षत्रिय ना' अशी आठवण करून दिली. तेंच वर्म खरं दादा. आधींचं औषध फुकट गेलं कारण रोगहि खोटाच होता. पण डोळयाला झापड पडली तर त्याच्यावर हात फिरवून का तो उघडतो ? त्याला डोळा जोरानं उघडून त्यांत सुंठीचं बोटच फिरवलं पाहिजे. पण गीतेच्या बुकांत कांहीं तसं लिहिलंच आहे त्याला तुम्ही काय करणार आणि मी काय करणार ? लिहिलं आहे तेंच तुम्हीं सांगितलं आणि मींहि ऐकलं हें खरं. पण माणसाला माणसाचा अदमास असतोच कीं नाहीं ? म्हणून तुम्हांला आपला माझा अदमास सांगितला कीं, अर्जुनाच्या डोक्यांत क्षणभर वेडाची लहर आलीच असली तरी तो लगेच आपणहून शुद्धीवर आला असेल. आधींच लढाऊ माणूस. कौरवांनीं अन्यायानं जन्मभर छळलेला. तो काय लढल्याशिवाय परत फिरतो ? आणि सांगूं का, दादा, बुक ल्याहायचं झालं तरी त्यांत वाचणाराला पटेल असं लिहावं का आपलं भाराभर काय वाटेल तें ? लढाईच्या मैदानावर यासपीठ मांडून पोथी

सोडून कुणीं पुराण सांगितलं हें मनाला पटतच नाहीं बघा. बाकी मी काय? ल्याहाय वाचायलाहि न येणारा कुणबट शेतकरी. मीं नांवं तरी कशीं ठेवावीं गीतामाईला? पण आपलं वाटलं तें सरळ सांगितलं तुम्हांला दादा!'

## संवाद ६ वा

आम्ही पढीक सुशिक्षित माणसं, आणि गेनबासारखा न शिकला सवरलेला पण जातीचा बुद्धिवान् माणूस, यांत जो फरक असतो तो मला या संभाषणांत कळून आला. मी स्वतः भाविक नाहीं. शब्दप्रामाण्याचा बंदा गुलाम नाहीं. तथापि रणांगणावर वेदांत पढविणं हें कितीसं स्वाभाविक आहे ही शंका मला गीता वाचतांना पूर्वीं कधीं आली नाहीं. तसंच श्रीकृष्णानं तशा बिकट प्रसंगीं खरोखर वेदांत व अध्यात्म सांगून अर्जुनाला युद्धाला उभा केला असेल? कीं मानवी भावनेला पटणारं व त्याला कार्यप्रवृत्त करणारं कांहीं व्यावहारिक शहाणपण थोडक्यांत सांगून ती गोष्ट केली असेल? हा विचार माझ्या मनांत पूर्वीं कधीं आला नव्हता. आमची गीता वाचण्याची दृष्टिच वेगळी असते. ती अशी कीं, गीतेचा जो मुख्य प्रसंग युद्धाचा तो आम्ही विसरून जातों, आणि त्यांतील विद्वत्तापूर्ण तत्त्वज्ञान हाच गीतेंतला मुख्य भाग असं मानून आम्ही चालतों. यामुळं युद्धप्रसंग व अध्यात्माचा उपदेश या दोहोंतील स्वाभाविक विसंगति आमच्या लक्षांत येत नाहीं.

याच्या अगदीं उलट दृष्टि गेनबाची ठरली. हेंच अध्यात्म, हाच वेदांत. पण समजा, एखाद्या ऋषीच्या आश्रमांत इतर चार ऋषि जमले असतांना, आचार्यानं शिष्यांना किंवा श्रोत्यांना तो सांगितला अशी गीतेची मांडणी असती, तर गेनबाला ती पटली असती. मग तो विषय त्याला किती थोडा

कां समजेना ? पण तो पडला व्यवहारी माणूस. यामुळं युद्धाला चेतविणं हें साध्य, आणि अद्वैती वेदांत हें त्याचं साधन या गोष्टींचा त्याच्या मनांत मेळच बसेना. तेंच त्यानं खुल्या मनानं मला बोलून दाखविलं. याहून जास्त कांहीं नाहीं. त्याला कदाचित् हेंहि पटलं असतं कीं, हाच क्षत्रिय वीर अर्जुन, अभिमन्यूच्या मृत्यूमुळं, विषण्ण मनःस्थितींत रात्रीं आपल्या शिबिरांत बसला आहे. जवळ पांडव स्त्रियाहि आहेत. अशा वेळीं धौम्यासारखा एखादा ऋषि आला आहे. तो यांच्या दुःखपरिहारार्थ 'सगळ्या जगाचा आत्मा एक, आत्मा अमर अविनाशी आहे, किंवा जन्माला आलेला प्राणी केव्हां तरी मरायचाच' असलं वेदांती तत्त्वज्ञान सांगतो आहे, आणि तद्वर्णनपर एखादी गीता लिहिली गेली हें गेनबाला पटलं असतं. पण प्रत्यक्ष युद्धाला चेतवणी हा हेतु ! आणि वेदांत हें त्याचं साधन ! आणि तेंहि मेलेल्यालाच मार म्हणणं ! हें गेनबाला पटलं नाहीं यांत त्याची काय चूक ?

पण कालच्या संभाषणावरून मला एक कल्पना सुचली. अशी कीं, अशिक्षित मनुष्यालाहि स्वाभाविक उपजत बुद्धीनं एकंदर तत्त्वज्ञाना-सारखा विषय समजणं किंवा पटणं शक्य आहे. म्हणून दुसरे दिवशीं फिरून एकत्र आल्यावर मी त्याला म्हणालों 'गेनबा, मी कांहीं तोंडदेखलं बोलत नाहीं. काल तूं जी शंका घेतलीस ती अगदीं बरोबर होती. पण महाभारत हा ग्रंथच असा आहे कीं, मुळांतील कौरव पांडवांची कथा थोडक्यांत ओळीनं लिहिली तर ती अगदीं सुसंगत, स्वाभाविक, मनोरंजक आणि बोधप्रद ठरते. तसंच महाभारतांत निरनिराळ्या ठिकाणीं आलेले नीति वेदांत तत्त्वज्ञान, हे भाग कोणी व्यवस्थित करून विषयवार एकत्र मांडले, तर तोहि ज्ञानसंग्रह मोठा अमूल्य ठरेल. पण एका कामांत निष्का-रण दहांचा हात पडावा त्याप्रमाणं, मूळ कथानक, आणि सांपडेल तो योग्य वा अयोग्य प्रसंग साधून अनेक पंडितांनीं त्यांत घुसडून दडपून दिलेलं स्वतःच्या पंडितगिरीचं प्रदर्शन, यांची अशी कांहीं गल्लत झालेली आहे कीं, त्यानं इतिहास बिघडतो, तत्त्वज्ञानहि बिघडतं, आणि

समग्र ग्रंथाविषयीं एकप्रकारची अश्रद्धा उत्पन्न होते. आतां वास्तविक माझ्यापेक्षां तूंच अधिक श्रद्धावान् आहेस. ' ही पहा महाभारताची पोथी ' असं म्हणून ती कोणी तुझ्या हातांत दिली तर तूं ती एकदम उचलून पूज्यभावानं कपाळाला लावून वंदन करशील. मीं महाभारताविषयीं इतकी श्रद्धायुक्त आदरबुद्धि कधींच बाळगली नाहीं. तरी पण कालच्या भाषणांत तूं जशी शंका काढलीस तशी काढून मी कधीं चिकित्साहि केली नाहीं. आमची दृष्टि केवळ त्यांतल्या विषय तात्पर्यावर असते. मघाशीं म्हटल्याप्रमाणं त्यांतला पौराणिक, म्हणजे युद्धप्रसंगाचा भाग हा आमच्या लक्षांतहि येत नाहीं. यामुळं गीतेंत कुठं कुणीं सांगितलं व तें केव्हां कसं सांगितलं याचा विचारच आमच्या मनाला शिवत नाहीं. पण तुझं मन पडलं शुद्ध स्वच्छ. पंडितगिरीचीं पुटं त्यावर चढलेलीं नाहींत, म्हणून गीतेचा प्रसंग आणि त्यांतलं अध्यात्म यांची व्यावहारिक विसंगति तुझ्या लक्षांत चटकर आली, आणि ती तूं बोलून दाखविलीस. याचा अर्थच हा कीं न शिकलेल्या माणसांचीं मनं निर्मल आरशासारखीं असतात.'

गेनबा बोलून चालून आशिक्षित. साधं लिहिणं वाचणं या पलीकडे त्याची साक्षरता गेली नव्हती. त्याला ज्ञान विज्ञान अध्यात्म यांतलं काय कळणार ? तो धार्मिक वृत्तीचा होता तरी त्याच्या धार्मिक कल्पना आचारापुरत्या व त्याहि परंपरागत. अशा माणसाला गीतेचं तत्त्वज्ञान कितीसं कळणार ? पण गेनबाची उपजत बुद्धि जाणती होती. तिच्या पकडींत सांपडण्यापुरत्या विषयांत तो बरा वाद करी. हें पाहून मलाहि उमेद वाटूं लागली कीं अशा माणसाला जर मला गीतेचं तत्त्वज्ञान समजावून सांगतां आलं नाहीं, तर धिःकार असो माझ्या पढिक विद्वत्तेला व बहुश्रुतपणाला. पण त्याला व्याख्यान देण्यापेक्षां त्याच्याशीं प्रश्नोत्तररूप चर्चा केली तर ती त्याला अधिक आवडेल पटेल. आणि प्रश्नोत्तराची पद्धति स्वीकारल्यानं त्याच्या डोक्यांत असलेलं उपजत ज्ञान बाहेर पडून त्याच्या अनुषंगानं त्याची समजूत पाडणं अधिक सोपं जाईल. असं

अनुभवावरून मला वाटल्यामुळं, त्या पद्धतीचाच उपयोग करण्याचं मीं ठरविलं. आणि दुसरे दिवसापासून मी असं करूं लागलों कीं, रात्रीं ज्या विषयाची चर्चा गेनबाबरोबर करावयाची तिचे कांहीं प्रश्न दिवसा आपल्या मनानं विचार करून ठरवावयाचे. आणि या पद्धतीनं त्याचा विषय त्याच्याचकडून वदविल्यासारखं आमच्या चर्चेला स्वरूप आलं. ही योजना अंमलांत येण्यापूर्वीं झालेल्या त्याच्या माझ्या संभाषणांत गीतेचं तात्पर्य येऊन गेलंच होतं. पण आतां त्याचीच उजळणी क्रमवार व तपशीलवार त्याच्याकडून करण्याचं मीं ठरविलं.

मी म्हणालों 'मीं तुझ्याशीं आज एक सर्वसाधारण विषय बोलणार आहे. आणि मी जे प्रश्न विचारीन त्यांचीं उत्तरं तूं अगदीं खुल्या मनानं खरीं सुचतील तशीं दे. संकोच करूं नको. तुला कांहीं समजून सांगावं व सांगतां येईल असं मला वाटेल तिथं मीहि तुला सांगेन, समजावून देईन. कारण तूं पुस्तकं वाचलेलीं नाहींस. मीं तीं पुष्कळशीं वाचलीं आहेत. यामुळं या विषयावर शेंकडों हजारों वर्षांत कोणी कोणी काय काय लिहून ठेवलं आहे हें मला तुझ्यापेक्षां अधिक माहीत आहे. तूंहि शाळेंत कॉलेजांत गेला असतास तर ती माहिती तुलाहि स्वतःच्या वाचनानं मिळाली असती.'

गेनबा म्हणाला 'दादा आळशावर गंगा यावी तसंच तुम्ही या गांवीं आल्यानं मला झालं बघा. एरवीं तुम्ही आम्ही बोलतों त्यांतलं कांहींहि माझ्या तोंडून निघायचाच काय पण कानानं ऐकण्याचाहि प्रसंग मला जन्मांत आला नसता. 'संकोच धरूं नको खुल्या मनानं सुचेल तें बोलत जा' असं तुम्हीं म्हटलं खरं. पण राहून राहून वाटतं कीं मी गाढवासारखा केव्हां काय बोलून जाईन याचा काय नेम ? पण चालूं द्या दादा. मी बरोबर बोललों तर कौतुक करणार तुम्ही. तसंच चुकीचं बोललों तरी संभाळून सावरून घेणार तुम्हीच.'

मग मीं प्रश्न विचारण्याला सुरवात केली. आणि मौज ही कीं त्याला

पहिला प्रश्न म्हणून मी कोणता केला हें तुम्हीं वाचलं म्हणजे माझ्या धाडसाचं कौतुकच कराल.

मी म्हणालों, ‘ गेनबा, हें जग कुणी उत्पन्न केलं असं तुला वाटतं ? ’

गेनबा हात वर करून चेपून गेल्यासारखं म्हणाला ‘ फारच सोपा प्रश्न विचारलात कीं, दादा ! पण मला सुचेल तें मीं सांगावं असं तुमचं आमचं ठरलं आहे म्हणून सांगतोंच तर—हें जग देवानं उत्पन्न केलं. ’

‘ मग देवाला रे कुणीं उत्पन्न केल ? ’

‘ देवापलीकडं आणखी कुणी असल असं मनाला वाटतच नाहीं. तवां, देव आपल्या आपणच जन्माला आला असल असं वाटतं दादा. देवच सगळ कांहीं करतो अशा विचाराचं बाळकडूच मला आईनं पाजलं जणूं. मग देवाला करणारा दुसरा कोणी असेल असं माझ्या मनांत तरी कसं यावं ? ’

‘ आणि दुसरं कांहीं कारण ? तुला स्वतःला सुचलेलं ?

‘ तें असं. फळझाड आपण आपल्या हातानं लावतों, धान्याचं बीं आपण पेरतों, तेव्हां पीक येतं. पण गवत कोणी लावीत नाहीं पेरीत नाहीं. पाऊस पडल्यावर तें चहूंकड आपल्या आपण उगवतं. तसंच देवाला आपल्या आपण व्हायला काय हरकत ? गवताप्रमाणं रानवट फळझाडं आपोआप उगवतात फळं धरतात. त्यांच्या कोया बिया बाठ्या कोणी माणूस लावतो का ? तींहि गवताप्रमाणंच आपोआप रुजतात उगवतात कीं नाहीं ? रानटी हां ! ’

मी म्हणालों, ‘ तसं खरं वाटत नाहीं. रानपाखरं रानटी झाडांचीं फळं तोंडानं खातात, आणि त्यांच्या दुसऱ्या वाटेनं त्या झाडांच्या बिया बाठ्या कुठं तरी जमिनींत पडून रुजतात. पण आपण असे मागं मागं गेलों तर अगदीं मूळारंभीं एक झाड तरी होतंच ना ? झालं तर. त्याच-प्रमाणं मूळारंभीं गवताची एक काडी असेल, आणि तिला फळं आणि त्यांत बिया नसल्या तरी गवताच्या मूळांतल्या एका काडींतून दुसरी काडी जमिनींत खालच्या खालीं उगवत असेल आणि अशा रीतीनं गवत रानभर आणि जगभर पसरत असेल ? ’

‘ मीं झालं तरी तेंच म्हणतों, दादा. देव पहिल्यानं आपोआप झाला. मग देवानं पहिल्यानं एकेक जातीचं एकेक फळझाड, एकेक प्रकारच्या गवताची एकएक काडी उत्पन्न केली असेल. आणि पुढं झाडंच झाडं आणि गवतच गवत उत्पन्न झालं असेल. पण हें झाड आणि ही गवताची काडी मूळ देवानंच उत्पन्न केली असली पाहिजे नव्हे कां ? ’

‘ होय. आणि तूं म्हणतोस त्याचाच पुरावा म्हणून मी हें सांगतों कीं, सलग जमिनीवर पक्ष्यांकडून किंवा गवताच्या मुळाकडून झाडं आणि गवत यांचा फैलावा विस्तार वाढ झाली असेल. पण मोठमोठ्या समुद्रांनीं दुरावलेल्या देशांत त्याच प्रकारचीं फळझाडं फुलझाडं गवतं उगवलीं याचा अर्थ, तिथं एकापासून पुष्कळ झालीं तीं स्वतंत्रपणं झालीं. कारण इतके मोठे समुद्र उल्लंघणारे पक्षी असत नाहींत किंवा वाऱ्यावरहि बीं इतक्या लांब उडून जाऊं शकत नाहीं. ’

‘ पण मग, दादा, जिथल्या तिथल्या जमिनींत प्रत्येक प्रकारचं झाड व गवत ईश्वरानं उत्पन्न केलं असलं पाहिजे. आणि पाखरं, जनावरं, यांची वाढ देखील अशीच होत असेल नाहीं ? जो न्याय झाडांगवतांना तोच यांनाहि लागत असेल. पण मूळ उत्पन्न करणारा ईश्वरच ! आणि जिवंत प्राणीच काय पण जीव-प्राण नसलेले समुद्र, पर्वत, नद्या, याहि देवानंच उत्पन्न केल्या असतील असं कां म्हणूं नये ? ’

‘ अलबत म्हणावं कीं ! पण असं सांग कीं मूळचं झाड, गवत, पशुपक्षी, मनुष्य आणि पर्वत, नद्या यांसारखे पदार्थ देवानं एकेक घेऊन आपल्याच हातानं वेगवेगळ्या ठिकाणीं उत्पन्न केले ? किंवा त्यानं एकदां उत्पत्तीचं काम सुरू करून दिलं आणि मग तें कुणा एकाच्या स्वाधीन करून दिलं आणि आपण गप्प बसून पहात राहिला ? ’

‘ देवाला हातांना आणि वेळेला काय तोटा ? प्रत्येक गोष्ट आपल्या हातानं करायला त्याला काय अवघड ? आणि देवाला उद्योगाचा कंटाळा असेल असं तरी कसं म्हणावं ? पण एकेकाला वेगवेगळं जन्माला घालण्याचं काम करीत देव बसला असं मानायला आपलं मन तरी शिणतं दादा.

माझ्या लहानशा शेतीबागायतीचं सुद्धां सगळीं कामं मीच आपल्या हातानं कुठं करतों ? मींहि एक नोकर ठेवला आहे. त्यालाहि शेतीबागायती मशागती यांचं बरंचसं कळतं. म्हणून कांहीं कांहीं काम त्याच्यावर सोपवून एखाद वेळीं चारआठ दिवस गांवालाहि जातों.'

'आणि तसंच म्हणतोस, देवानं आपलं उत्पत्तीचं काम कोणा नोकराकडं हस्तकाकडं मुखत्याराकडं सोंपवून दिलं असेल ? कंटाळ्याचा प्रश्न नाहीं. पण जें काम दुसऱ्याकडनं आपल्याइतकंच चांगलं होईल असा भरंवसा देवाला वाटला, त्याच्याकडं तें जर सोपवून दिलं तर त्यांत चूक नाहीं असंच ना तुझं म्हणणं ?'

'होय दादा. पण नोकर ठेवला तरी देवाला तो एकटा एकच कसा पुरणार ?'

'मग हे इतके नोकर कोणते ?'

'कोणते म्हणजे काय ? प्रत्येक वस्तूंत थोरल्या देवानं एकेक लहान लहान देव उत्पन्न करून ठेवला आहे. म्हणूनच ना आम्ही झाडांत देव, पाण्यांत देव, डोंगरांत देव, वाऱ्यांत, आगींत देव असं मानतों ?'

'या लहान देवांची कल्पना ठीक दिसते. मनाला गोड वाटते. पण याहिपेक्षां आपल्या या धरितीमातेला हा उत्पत्तीचा सर्वाधिकार, स्वयंभू असा, देवानं कुलमुखत्यारीनं दिला असं मानलं तर तें अधिक बरं नव्हे का ? आणि तुझ्या लक्षांत हेंहि आलं असेल कीं, या ज्या देवता तूं मानतोस त्या कांहीं उत्पत्ति करणाऱ्या नाहींत. तर माणसावर, आणि तेंहि माणसावरच, कृपा-अवकृपा करणाऱ्या, आणि थोडसं कांहीं दान दिलं म्हणजे संतुष्ट होणाऱ्या अशा आहेत. इतक्या हलक्या मनाच्या देवता मुळांत असतील का ? आणि असल्या हलक्या मनाच्या देवतांकडून देव आपलीं कामं करून घेतो असं मानणं म्हणजे त्या मोठ्या देवाला कमीपणा आणणं नव्हे का ?'

## संवाद ७ वा

गेनबा म्हणाला, ‘ दादा, तुम्ही मला खोल पाण्यांत नेताय बरं ! आणि मीहि वेडा माणूस तुम्ही विचारतां त्याचं उत्तर आपला सरळ सुचेल तसं देतों. पण खरं बोलायचं तर असल्या गोष्टी तुमच्या सारख्याशीं बोलायला मन लाजतं माझं.’

मी म्हणालों, ‘ जें चुकतं तें हेंच गेनबा. थांब मी तुझ्या मनाची लाज काढून टाकतों. ती अशी बघ कीं, जग कुणीं उत्पन्न केलं, देव कुणीं उत्पन्न केला का आपआप झाला, अशा मोठ्या गोष्टी बोलायला तूं अधिकारी नाहींस. पण मी तरी अधिकारी आहें असं का तुला वाटतं ? ’

‘ होय, थोडसं वाटतं खरं.’

‘ तें कां ? ’

‘ तुम्ही इतकीं बुकं वाचतां म्हणून. त्यांत या देवाचं या पिरथीवीचं काईबाई लिहिलं असेल ना ? ’

‘ पण कुणीं बुकांत लिहिलं म्हणूनच कां तें खरं ? समज तूं आज काल जें जें बोललास तें छापून एकादं लहानसं बुक केलं, तर मग मात्र तूं माझ्यासारखा देवाविषयीं बोलायला अधिकारी झालास म्हणायचा ! ’

या माझ्या बोलण्याचं गेनबाला खूप हंसू आलं. तो म्हणाला, ‘ हां दादा, कराच कीं एवढी गंमत. पण तें जाऊं दे. आपल्या भोळया भावानं मी येवढंच समजतों कीं, बुकं लिहितात ते लोक खरं लिहितात, विचार करून लिहितात, म्हणून त्यांना महत्त्व.’

‘ होय, बुकं लिहिणारे लोक मनाला खरं वाटेल तेंच लिहितात. विचार करूनहि लिहितात. इतर पुष्कळांनीं काय लिहिलं हें जें त्यांना वाचायला सांपडतं तें तुला, इंग्रजी येत नाहीं म्हणून, कळत नाहीं हें सारं खरं ! पण हें बघ, बुकं लिहिणारांनीं तरी देवाविषयीं नुसत्या कल्पनाच केल्या ना ? मग अशा कल्पना चालवायला तुलाहि अधिकार आहे. बरं. दे तें सोडून. आन् पुढं चल. तुझ्या सारखंच माझंहि मत आहे गड्या. असं कीं, ही

पिरथिमी देवानं केली. ती कांहीं आपोआप झाली नाहीं. पण देव मात्र आपोआप झाला. त्याला कुणीं केलं नाहीं. पण तो आपोआप कसा व्हावा हें कुणालाच सांगतां येत नाहीं. पण काय रे, तूं जग कशाला म्हणतोस ? '

' जें हें डोळ्याला दिसतं भोंवतीं त्याला. '

' पण मग थोडं वर मान करून आभाळाकड बघ बरं. तिथंही तुला कांहीं तरी दिसतं ना ? मग तेंहि जगांतच आलं.'

' होय, दादा. हीं नक्षित्र आणि चांद सूर्यसुद्धां जगांतच आले. त्यांना वगळून कसं चालेल ? '

' मग वर आभाळांत पाहून तुला काय कसं दिसतं तें सांग बरं ? बरी आज काळोखी स्वच्छ रात्र आहे. '

' सांगूंच दादा, सांगूंच दादा ? मातर हंसूं नका. मुंबईला एकदां रात्रीचे कापाच्या मैदानांत खेळ झाले. तेव्हां हे वर दिसतात तारे तसेच शेंकडों हजारों मोटारींचे जळते दिवे लांबून दिसत होते. तसंच मी एकदां रात्रीचा मलबार हीलवर गेलों होतों, आणि तिथून पाहिलं तर चौपाटीच्या समुद्रापलीकडं सगळ्या मुंबईभर दिवे लागले होते. तसंच मला या आभाळांत हे तारे दिसतात. '

' तूं छान सांगितलंस. बरं, हे तारे अधांतरी कसे रे ? खालीं पडत कसे नाहींत ? '

याचं ग्यानबाला कांहींच उत्तर सुचेना. तो गोंधळला. मी म्हणालों, ' बरं ही तुझी पिरथिमि या ताऱ्यासारखीच अधांतरी आहे कीं कशी ? '

' म्हणतात बा, कीं तिच्याखालीं शेष फडा काढून बसला आहे. अन् त्यानं ही पिरथिमि डोक्यावर धरली आहे.'

' तसं नाहीं. आणि इथं मात्र तूं म्हणतोस त्याप्रमाणं बुकं वाचणाराला कांहीं असं कळतं कीं तें तुला बुकं वाचल्याशिवाय कळणारच नाहीं. '

' मग सांगा ना दादा त्यांतलं कांहीं समजाऊन. '

' सांगतों ऐक. ही जी पिरथिमि तुला सपाट दिसते ती तशी नाहीं.

सातासमुद्राची सफर करून जगाला प्रदक्षिणा घालून लोक परत त्याच ठिकाणीं येतात. म्हणून हें ठरतं कीं, पृथ्वी सपाट नसून वाटोळी आहे. शिवाय तिला शेषाबिषाचा कांहीं आधार नसून ती वरच्या या ताऱ्या-सारखी अलगद् अंतराळींच आहे. शिवाय हा पृथ्वीचा वाटोळा गोळा आणि ते आभाळांतले लकलकणारे गोळे हे सारखे फिरताहेत. त्यांना विश्रांति म्हणून कशी ती नाहीं. त्या लांबच्या ताऱ्यावर समज तूं उभा आहेस तर, तुलाहि ही पृथ्वी वाटोळी आणि ताऱ्यासारखी चमकणारीच दिसेल. मघाशीं कापाच्या मैदानांतल्या मोटारींचं उदाहरण दिलंस, तीच कल्पना घेऊन, ही पृथ्वी काय ते तारे काय मिळून या सगळया जगाला मी गम-तीनं दाखला लाऊन दाखवितों म्हणजे तुला कल्पना येईल. ही प्रचंड पृथ्वी म्हणजे एक प्रचंड मोटार आहे. मात्र वाटोळी आहे. ती अंतराळीं उभी आहे आणि धांवते आहे. तिला रस्ता कुणी बांधून द्यायला नको. जसा काय संगमरवरी दगडाचा रस्ता तिला देवानं बांधून दिला आहे.'

'पण दादा, तिला चाकं ?'

'आहेत. तूं ऐकलं आहेस ना ? राम झाला तें कृतयुग. आपले ऋषी झाले तें त्रेतायुग. कृष्ण झाला तें द्वापारयुग. आणि हल्लींचं हें कलियुग. हीं चार युगं वाटोळीं फिरतात म्हणून तींच तींच पुन्हां पुन्हां येतात. मग नव्हे कां, हीं चार युगं म्हणजे तींच जगाच्या मोटारीचीं चाकं ? आणि या चाकांना आरे पाहिजेत जोडायला. ते वर्षाचे तीनशें साठ दिवस. जसं कांहीं त्या आऱ्यांचीं नाकं या चाकांत घुसविलीं आहेत. आतां हीं चार चाकं कशानं जोडलीं आहेत म्हणशील तर तीन त्रिकाळाचं एक अखंड दांडकं करून. त्रिकाळ म्हणजे आजच्यापूर्वीं होऊन गेला तो सगळा काळ, आजचा काळ, आणि उद्यांपासून पुढं होणारा सगळा काळ, मिळून तीन झाले कीं नाहीं ?'

'हां जुळलं दादा. आणि या चार चाकांवर जोडून बांधली मोटार. पण आतां कल्पनाच करायची तर या मोटारीला टप कुठं आहे ?'

‘ वरचं निळं आभाळ हा टपच. आणि त्या टपांत या साऱ्या ताऱ्यांचे दिवे करून लावले आहेत. असतात का तुझ्या एखाद्या तरी मोटारीला इतके दिवे ? आणि मोठे तोंडचे दिवे हवे, तर ते चंद्र आणि सूर्य नव्हेत का ? डोळे दिपतील एवढा प्रकाश.’

गेनबा हंसून म्हणाला, ‘ आन् दादा, मोटार तयार झाली, पण त्यांत पासिंजर ? ’

‘ मग तुम्ही आम्ही हे दुसरे कोण ? हल्लीं उतारूंची गर्दी असतेना मोटारींत ? तशीच खेच आहे बघ. या दिव्य मोटारींत माणूस पक्षी पशू आणि अवांतर सगळ्या प्राण्यांची.’

गेनबा हंसून म्हणाला, ‘ बरं झालं दादा ! आपला फुकटचा प्रवास करायला मिळतो म्हणायचा ! ’

‘ वाः तसं कसं होईल ? या प्रत्येक प्राण्याला तुला मला एकेक कायमचं तिकिट, जन्माचं खातं मांडून, त्या मालकानं दिलं आहे.’

‘ आणि या पासिंजरांना खायला प्यायला ? ’

‘ काय कमी ? हीं शेतं, हे मळे, या बागा, रानांतलीं फळझाडं, हें गवत, आणखी खायला काय पाहिजे ? आणि हे समुद्र नद्या यांच्या पाण्यानं मोटारींतल्या मोटारींत आंघोळ करायची आणि गोड पाणी प्यायचं.’

‘ अन् दादा, या मोटारीचा ड्रायव्हर कुठं आहे ? ’

‘ हीच तर गंमत आहे या मोटारीची. यांतहि ड्रायव्हरची सीट आहे. पण तिच्यावर बसलेला ड्रायव्हर कधींच कुणीं पाहिलेला नाहीं बघ ! तरी पण तोच मोटार चालवितो आणि चालतां चालतां क्लीनरचं कामहि आपणच करतो. सगळ्या पासिंजरांवर नजर ठेवतो आणि सगळ्यांचीं तिकिटं तपासतो. सगळं कांहीं एकटा करतो. पण एक अडचण आहे गड्या या मोटारींत. इच्यांत चढून बसायला दार आहे, पण उतरायला नाहीं. अशी ही मोटार हें सगळं घेऊन भरभर चालली आहे. तिला डावी उजवी दाखवायला पोलीस नाहीं.’

‘ पण दादा, ही मोटार चालली तरी कुणीकडं ? ’

‘ हां गड्या तेवढंच सांगायचं कठीण. कल्पनेनंहि तें सांगतां येत नाहीं. आणि ती कुणीकडं चालली याचा विचार ब्रह्मदेवापासनं चालू आहे म्हणतात. पण त्याचा अजून निकाल लागला नाहीं म्हणतात. आणि पुढं कधीं लागणार नाहीं.’

‘ दादा, तुम्हीं जगाची मोटार करून दाखविलीत खरी गमतीची, पण वाटतं, हें कसलं जगाचं जिणं कीं त्याला आलों कुठून कळत नाहीं अन् जाणार कुठं हें बी कळत नाहीं. असला एखादा माणूस पोलिसाला गावला—म्हणजे ‘ आलों कुठून माहीत नाहीं, अन् जाणार कुठं माहीत नाहीं’ म्हणणारा, तर त्याला धरून वेड्याच्या इस्पितळांत कोंबतील, आणि वेडा नाहीं असं ठरलं तर ‘ भटक्या’ म्हणून त्याला जामीन मागतील !’

‘ असं आहे खरं, गेनबा. पण त्याला करणार काय ? तुला मला म्हणजे माणसाला तर मागच्या तीन पिढ्यांपलीकड माहिती नसते. आणि पुढच्या पिढ्यांची तर बोलायलाच नको. आपण भटक्ये खरे. तसंच आपलं हें जग ! पण देवाचाहि जामीन मागावा लागेल हो, या दृष्टीनं ! हें बघ, ईश्वराला तरी सांगतां येईल कां आपण आलों कुठून आणि जाणार कुठं तें ?’

‘ तें कां नाहीं, दादा ? त्याला तर सगळ कांहीं कळत म्हणतात आणि म्हणूनच ना त्याला देव ईश्वर म्हणतात ?’

‘ अरे ईश्वराला जर पूर्वीचा जन्मच नाहीं, तर तो सर्वज्ञानी झाला म्हणून त्याला पूर्वीच्या जन्माचं ज्ञान कसं असणार ? आणि त्याला जर मरण नाहीं आणि म्हणून पुढचा जन्म नाहीं, तर त्याला झालं तरी आपण पुढं कुठं जाणार हें ज्ञान कसं असणार ? मिळून काय कुणी झालं तरी, देव काय माणूस काय, आपण आहों त्याचं जें जेवढं ज्ञान मिळण्यासारखं असतं तेवढ्यावर भागवून घ्यायला पाहिजे खरं.’

‘ बरं, दादा, ईश्वर असो आपल्या आपण जन्मलेला आणि कधीं न

मरणारा. पण त्याला हें जग जन्माला घालायची कशाला हो पडली येवढी उठाठेव’ ?

‘हें सांगतां येणं कठीण. पण आपल्या जुन्या लोकांनीं ऋषींनीं कांहीं कल्पना चालविल्या आहेत त्याच्याविषयीं. कुणी म्हणतात त्यानं केवळ करमणुकीकरितां सृष्टि केली. ईश्वरालाहि लीला आवडते म्हणे. म्हणून तो खेळ मांडल्यासारखी सृष्टि उत्पन्न करतो, तिचा खेळ पाहतो पाहतो, अन् पाहणं नकोसं झालं म्हणजे मोडून गुंडाळून ठेवतो.’

‘कांहीं तरीच बोलणं दादा, ऋषींचं झालं म्हणून काय झालं ? तुम्ही आम्ही माणसं खेळून करमणूक करूं. पण ईश्वर ? माणसाचं काढून देवाला लावावं ?’

‘होयच, नाहीं तर काय ? देवाची कल्पना माणसावरनं करायची नाहीं तर मग कशावरनं रे ? त्याला आपण प्रेमळ दयाळू उपकारकर्ता मोक्ष देणारा संकटनिवारण करणारा—असं तसं एक सोडून दहा म्हणतों. तीं सारीं माणसाच्या गुणांचींच नांवं ना ? झालं तर मग. देव हा माणूस-गुणी तर त्याला खेळ करमणूक आवडावी असं म्हटलं तर त्यांत रे काय चुकलं ? बरं पण माझा तसा आग्रह नाहीं हो. देवानं करमणुकीखातर सृष्टि केली हें म्हणणं तुला आवडत नसेल तर दे सोडून. देव आणि सृष्टि एकदमच जन्माला आली, म्हणजे देव आणि सृष्टि हीं बापलेक नसून भावंड, भाऊ—बहीण आहेत, हें तुला पटत असेल तर तसं म्हण. त्याला माझी तक्रार नाहीं. नाहीं तर तिसरी एक कल्पना. ब्रह्मांड म्हणून एक मोठं अंड होतं. देव म्हणून एक जीव होता. त्या जीवानं तें अंड पाहिलं फोडलं अन् त्यांत आपण शिरला. आहे कबूल ?’

‘छेः हें तर माझ्या बालाहि कबूल नाहीं व्हायाचं ! मला कबूल होईल तर तें हें कीं, आधीं देव होता आन् मग त्यानं जग उत्पन्न केलं. मग कशाकरतां का करीना ! खेळ करमणूक म्हणा नाहीं तर धंदा म्हणा ! ’

‘वाः रे गड्या, देवाला करमणूक म्हटली तें तुला खपलं नाहीं. आणि तूं मात्र देवाला धंदा आंगीं चिकटवतोस हें बरं दिसतं कां ? करमणूक

करण्याइतका संपन्न, सुखाची मोकळी वेळ गांठीं असणारा, देव मनांत आणायला बरा? कीं, धंदेवाईक देव बरा? म्हणजे, जग निर्माण करण्याचा उद्योगधंदा न केला तर ज्याचं पोट भरत नाहीं असला देव बरा? कीं तो केल्याशिवाय ज्याची सगळी चैन चालते तो देव बरा? पण एक गोष्ट खरी कीं, अंड्यांत जीव शिरण्याच्या कल्पनेपेक्षां अंड्यांतून जीव बाहेर पडण्याची तुझी कल्पना अधिक पटली. आणि कां नाहीं पटणार? कारण तुझ्या कोंबड्यांच्या खुराड्यांत मला तुला तेंच आढळतं! पण कायरे अंडीं घालणारी तुझी ती कोंबडी कुठून आली, पिल्लाच्या रूपानं ?'

'अंड्यातन ?'

'अन् तें अंड घालणारी कुणी कोंबडी असेलच !'

'नाहीं तर ?'

'अन् ती कोंबडी जन्मली तेव्हां ती देखील अशीच एका अंड्यांतन बाहेर पडली असेल ?'

'होय तर !'

'अन् मग फिरून तें अंड दुसऱ्या कुणा कोंबडीनं घातलं असेल ?'

'संपलं माझं बोलणं दादा ! हें तुमच्या प्रश्नांचं रहाटगाडगं हें चाक कधींच थांबायचं नाहीं कीं ! जाऊं द्या, तुम्हीं पहिल्यानं म्हणाला तेंच खरं. आपण आलों कुठून अन् जाणार कुठं हें आपणाला कळायचं नाहीं. तसंच आपल्या मागच्या दोन पिढ्यांपलीकडची माहिती आपणाला नसती, आणि न जन्मलेल्या पुढच्या एकाहि पिढीची. म्हणून आपण जाग्यावर उभे आहों तेवढं खरं. एर कल्पना करून डोकं पिकवणं हा शीणच. पण आतां मला सांगा कीं, तुमचं माझं बोलणं राहो, पण गीतामाई स्वतः या साऱ्याविषयीं काय म्हणते ? तेंच अधिक खरं असेल.'

'हां, तें म्हणजे गीतामाई काय म्हणते तें मात्र सांगायला सोपं आहे. कारण तें निश्चितपणं सांगितलं आहे. मग त्यावर कुणाचा विश्वास बसो नाहीं तर न बसो !

हे माझे शब्द ऐकतांच गेनबाच्या मनाला धक्का बसल्यासारखा दिसला. तो म्हणाला ' काय म्हणतां, दादा, गीतामाईवर कुणाचा विश्वास असो नाहीं तर नसो ? स्वतः तुमचा तर आहेना ? '

हें ऐकून मीच विचारांत पडलों. वाटलं कीं, मी आतां याला गीता सांगणार, अन् तें करतांना माझा गीतेवर अंध विश्वास नाहीं अशी याच्या मनाची इतकी सुद्धां कल्पना व्हावी हें बरं नव्हे. शिवाय माझा झाला तरी गीतेवर विश्वास नाहीं असं कसं म्हणतां येईल ? फक्त ' विश्वास ' या शब्दाचा गेनबाचा अर्थ तोच तंतोतंत माझा नसेल इतकंच. गीतेंतलं जें मुख्य तात्पर्य आहे तें मला खरोखर इतकं सुंदर वाटतं कीं, तसं तें दुसऱ्या कोणत्याहि धर्मग्रंथांत सांपडणार नाहीं. आणि सुंदर म्हणजेच मनाला पटणारं. म्हणजे विश्वासार्ह. फरक इतकाच कीं, गीता ही प्रत्यक्ष ईश्वरान सांगितली म्हणून तिचं तात्पर्य खरं असं गेनबा मानतो; आणि तें तात्पर्य माझ्या बुद्धीला, अगदीं काटेकोर अशाहि चिकित्सक बुद्धीला, पटतं म्हणून मी तें खरं मानतों. असो. अमृततुल्य दूधच प्यायला मिळतं. मग तें ज्या पेल्यांतून प्यायला मिळतं तो पेला पिवळा चकचकीत म्हणून एकाला शुद्ध सोन्याचाच वाटतो, व तो चकचकीत दिसला तरी शुद्ध सोन्याचा नसून शुद्ध चांदीचा पण सोन्याचा मुलामा केलेला आहे हें दुसरा जाणतो. असा समजुतींत फरक पडला तरी काय बरं बिघडलं ? पाहिलं कीं, मी गेनबाची गीतेविषयींची श्रद्धाळू कल्पना डळमळविली पण कांहीं विधायक चिकित्सक कल्पना तिच्या जागीं प्रस्थापित करूं न शकलों तर मीं काय मिळविलं ? असा विचार करून मी गेनबाला इतकंच म्हणालों. ' वाः माझा गीतेवर म्हणजे गीतेंतल्या ज्ञानावर पूर्ण विश्वास आहे याविषयीं शंका का वाटली तुला ? तशी शंका मुळींच नको. माझा तसा विश्वास असल्याशिवाय का मीं तिचा अभ्यास केला आहे ? ' असं म्हणून हातांतली गीता उचलून मी मस्तकाला लावली त्यानं मात्र गेनबाचं पुरं समाधान झालं.

## संवाद ८ वा

दुसरे दिवशीं दिवसभर गेनबाला गीता थोडक्यांत सोपी करून कशी सांगावी याचा आणखी मनाशीं विचार केला, आणि तो अमलांत आणण्याला पुढीलप्रमाणं प्रारंभ केला.

रात्रीं शांत वेळीं थंड हवेंत उघड्या अंगानं बसून आपण गीतेसारखा विषय गेनबासारख्या माणसाला समजावून देत आहों या कल्पनेनंच मला परमावधीचा आनंद झाला. मात्र मीं इतकीच खबरदारी घेतली कीं मुद्याचं तेवढंच त्याला सांगायचं, अतिशयोक्ति व पाल्हाळ मुळांतला टाळायचा, आणि आगंमागं करून ( म्हणजे केवळ अध्यायसंगतीला क्रमाला चिकटून न राहतां ) तात्पर्य तेवढं संकलित करून त्याला सजवून सोपं करून सांगायचं.

मी म्हणालों ' गेनबा, यापूर्वीं तुम्हीं आम्हीं एकमेकांशीं आडवे तिडवे प्रश्न विचारून संभाषणं केलीं तीं विसरून जा. तेव्हां आपण आपल्या मनचं बोलत होतों. चिकित्सा करीत होतों. आतां मी जें सांगणार त्यांतहि प्रश्नोत्तरं होतील. पण तीं एकमेकांना अडविण्याकरितां नसून समजूत पटवून घेण्याकरितां इतकंच.

गीतामाई काय म्हणते तें तुला सांगतों नीट ऐक. देव, ईश्वर, परमेश्वर हीं नांवं वेगळीं असलीं तरी तीं सर्व कुणा एकाचींच नांवं आहेत. ईश्वर हा भरीव आहे. आहे नाहीं तें सर्व त्याच्यामध्यें भरलेलं आहे. तो मूळचा ईश्वर कोणाला दिसत नाहीं. पण त्या भरीव ईश्वराची छाया म्हणजेच तिला माया म्हणतात. तिलाच प्रकृतिहि म्हणतात. छाया माया म्हटलं तरी ती पोकळ नाहीं. तिच्यांत ईश्वराचा भरीवपणा उतरतोच. उदाहरणार्थ, पाणी पृथ्वी आकाश अग्नि वारा मन बुद्धि अहंकार या सर्वांतून मिळून जड म्हणजे निर्जीव आणि सजीव असे पदार्थ व प्राणी शरीर घेऊन उत्पन्न होतात. मग असेना ती माया ?'

' काय दादा, दगड आणि माणूस हीं भावंडंच म्हणतां ? '

'कां नाहीं ? एका आईबापाचीं मुलं तीं भावंडच कीं ! दगडाच्या रीतीनं दगड जगतो, माणसाच्या रीतीनं माणूस जगतो ! पण तो माणूस मात्र नुसता जगत नाहीं. तर शरीराप्रमाणं त्याच्या मनाचीहि हालचाल होते. पण विसरलों हां. माणसाबरोबर पशुपक्षी, किडेमुंग्या, साप, वाघ, आणि तशींच झाडंझुडं वनस्पति हींहि सर्व एकदमच उत्पन्न झालीं. पण त्यांत फरक कसा आहे पहा. दगड जगतो म्हणजे नुसता निर्जीव असतो. त्याला स्वतःची हालचाल नाहीं. मग खाणंपिणं बोलणं विचार करणं हें कुठून येणार ? दगडाच्या पुढची पायरी झाडंझुडं वनस्पती यांची.'

'ती कशी ?'

'ती अशी कीं, दगड नुसता असतो. झिजतो. पण वाढत नाहीं. पण वृक्ष वनस्पति जन्मानंतर वाढतात. वाढण्याकरितां पाणी पितात, वारा खातात, जमिनींतलं खत आपल्या मुळांनीं शोषून घेतात. त्यांना पानं फुलं फळं येतात. म्हणजे माणसासारखी त्यांची प्रजा निर्माण होते. परंपरा चालू रहाते. दगडापासनं दगड होत नाहीं. पण झाडापासनं झाड होतं.'

'बरं दादा, झाडं दगडाच्या पुढं गेलीं खरीं. पण तीं जिवंत म्हणावीं तर त्यांना जागा सोडून जातां येत नाहीं ना ?'

'होय. पण जागा सोडून जाण्याची, चालण्या–धावण्याची, शक्ति नसली म्हणून तीं सजीव नाहींत असं होत नाहीं ना ?'

'मग दादा, तीं बंदिवानच म्हणाना ? तुरुंगांत नाहीं का कैदी राहात जेवत खात ? बाहेरच्या मोकळ्या माणसासारखे सगळे व्यवहार करीत ? पण त्यांना बाहेर पडून इकडचं तिकड जातां येत नाहीं आपल्या इच्छेनं हवं तसं ? असं नव्हे का ?'

'ठीक बोललास. झाडंझुडं बंदिवानच आहेत. ही उपमा तूं बरोबर दिलीस. कारण त्यांना जागा सोडून दुसरीकड जातां येत नाहीं.'

'बरं मग या झाडाझुडांपुढची पायरी कोणती ?'

‘ पुढची पायरी पशुपक्षी यांची. कारण तीं दगडाप्रमाणं जगतात, झाडांझुडांप्रमाणं खाऊन पिऊन वाढतात, पण शिवाय आपल्या पायांनीं पंखांनीं वाटेल तिकडं हिंडतात फिरतात. त्यांना मुलंबाळंहि होतात. झाडांझुडांना मुलं होतात, पण तीं जो संसार करतात त्या संसारांत नवरा बायको असलीं तरी दिसत नाहींत. पशुपक्ष्यांत मात्र नरमादी हा भेद दिसतो, व तीं संसारी माणसासारखीं कुटुंबांत राहतात असंहि दिसतं. पण त्यांना एक कमी आहे गड्या ! पशुपक्ष्यांना चालतां आलं तरी बोलतां येत नाहीं. फक्त आवाज काढतां येतो.’

‘ म्हणजे त्यांच्याहि पुढची एखादी पायरी आहे म्हणायची ! ’

‘ होय. आणि ती पायरी माणसांची. माणूस हा दगडाप्रमाणं जगतो. झाडांप्रमाणं वाढतो. पशुपक्ष्यांप्रमाणं चालतो धांवतो. पुढची पिढी निर्माण करतो. पण या सर्वांहून अधिक म्हणजे तो विचार करतो, तर्क लढवितो, आणि हें सर्व बोलून दाखवितो’ !

‘ बरं, पण माणसाच्या पुढची पायरी कोणती ? असलच एकादी ? ’

‘ या विषयीं गीता कांहीं स्पष्ट बोलत नाहीं. ती फक्त सृष्टि चार प्रकारची सांगते. ( १ ) उद्भिज म्हणजे झाडझुड वनस्पति. ( २ ) अंडज म्हणजे पक्ष्यादि. ( ३ ) स्वेदज म्हणजे कृमिकीटकादि. ( ४ ) जारज म्हणजे नर मादी संयोगानें झालेली. भूत, यक्ष, किन्नर, पिशाच्च, राक्षस— म्हणजे माणसांपेक्षां अधिक प्रबळ शक्तीची ही एक जात गीता मानीत असावी. पण माणसांपेक्षां अधिक प्रबळ असली तरी ती जात मनानं बुद्धीनं वेगळी नाहीं. त्यांतल्यात्यांत माणूस हीच प्रत सगळ्यांत गुणांनीं मोठीं किंवा पूर्ण. भूत यक्ष इत्यादि फार तर अतिमानुष म्हणावे. पण तेहि जारजच. नरमादींनीं केलेले. समंदाची बायको हडळ म्हणतात. राक्षसाची राक्षशीण, नर मादी. माणसांत जसा साधा माणूस आणि पैलवान ! बैलांत जसा साधा बैल आणि खिल्लारी टकरी बैल ! रेड्यांत जसा साधा रेडा व टकरी रेडा ! तात्पर्य, मुख्य जाती थोड्या असल्या तरी, प्रकृतीनं आपली हौस फेडून घेण्याकारितां कां म्हणेनास, गेनबा,

चौऱ्यांशी लक्ष जीवाचे प्रकार, आकार, रूप, स्वभाव गुणधर्म यांनीं वेगवेगळे उत्पन्न केले आहेत. आणि भूत पिशाच्च हीं माणसांहून प्रबळ असलीं तरी प्रकृतिमाईला माणूस हाच सर्वांत अधिक प्रिय दिसतो. गीता फक्त त्याचंच वर्णन करिते. त्यालाच बोध उपदेश करिते. त्यालाच ज्ञान सांगते, व त्यालाच मोक्षाची वाट दाखविते.'

'दादा, चौऱ्यायशी लक्ष योनी म्हणजे काय झालं? मला तर या संख्येची कल्पनाच होत नाहीं.'

'अरे नाहीं कां? केली तर होईल की. आजचीं सहासात मुंबई शहरं एकत्र केलीं तर त्यांतलीं माणसं होतील तितकी संख्या. तूं मुंबईत ज्या धन्याकड नोकरीला होतास त्याच्या दुकानांतली तिजोरी आणि नाण्याच्या थैल्या पाहिल्यास ना? त्यांत काय काय होतं?'

'तें कांहीं विचारूं नका. पै-पैशापासून रुपयापासून गिनीपर्यंत, तांब्याचीं चांदीचीं सोन्याचीं नाणींच नाणीं. थैल्या भरभरून. तिजोऱ्या भरून. मी कैकदां खांद्यावरनं या थैल्या मोठ्या बँकेंत नेऊन भरल्या आहेत. आणि एकदां तर थोरल्या टांकसाळींत जाऊन थैल्या भरून नाणं आणलं आहे.'

'झालं तर मग. तुला या सृष्टीच्या उत्पत्तीची कल्पना या टांकसाळीवरनं चांगली करतां येईल कीं! टांकसाळींत पडणारीं नाणीं फार तर दहापांच प्रकारचीं. पण देवाघरच्या प्रकृतीच्या टांकसाळींतल्या नाण्यांचे प्रकार कोण किती मोजणार? इतकाच फरक. किंवा अशी कल्पना कर कीं एकाच सोन्याच्या दोऱ्यांत अनेक आकाराचे पण सोन्यारुप्याचे तांब्यापितळेचे कांचेचे मणी ओवले आहेत. मणी वेगळे पण माळ एकच ना? तसेंच प्राणी वेगळे पण मूळ प्रकृति एकच ना? नाण्यांची किंमत आणि मण्यांचें तेज हें ज्याचं त्याला वेगळं असं वाटतं. पण मुळांत तें एकाच उगमापासून आलेलं आहे. भरीव बीं हें मुळांत गोठलेला रसच आहे! धुराचा रंग वेगवेगळा दिसतो पण आंतला विस्तव एकच. तात्पर्य काय, सृष्टींतले सर्व पदार्थ प्रकृतीपासून आणि प्रकृति ही परमेश्वरापासून

उत्पन्न झाली. म्हणून सर्व सृष्टि ही, लक्षावधि वेगवेगळी झाली तरी, परमेश्वराची किंवा परमेश्वरच म्हणण्याला काय हरकत !'

'वाः वाः दादा ! म्हणजे मी या सृष्टींतला एक यःकश्चित् माणूस—त्याला तुम्हीं परमेश्वरच बनविलंत की ?'

'मग यांत काय चुकलं ? टांकसाळींत एकाच चांदीच्या गोळ्यांतून निघणारा बंदा रुपाया, अधेली, पावली, चवली ही चांदीच नव्हे का ?'

'पण किमतींत फरक आहे तो ?'

'अरे तो फरक असायचाच. तुझ्यापुरता तूं ईश्वर. सगळ्या सृष्टीपुरता तो ईश्वर ! पण तुझा हजारों लाखों पिढ्यांपूर्वीचा जो पूर्वज त्याचाच वंशज तूं. म्हणून तूं तोच व तो तूंच असं म्हणण्यांत काय चूक ?'

'पण दादा, दगडापासनं माणसापर्यंत जर सगळीं एक आणि एकाच प्रकृतिमाईपासून झालीं म्हणून शेवटीं ईश्वरच, तर त्यांत वेगवेगळीं रूपं तसेच वेगवेगळे स्वभाव, आणि त्या मानानं श्रेष्ठ आणि कनिष्ठ, चांगलं आणि वाईट, कां मानावं हो ? एवढा माणूसच सगळ्यापेक्षां कां मोठा म्हणावा ? आणि तुम्हीच म्हणतां कीं गीतामाई माणसाला एकट्याला डोळ्यापुढं धरून त्यालाच सगळा उपदेश करिते ?'

'कारण, माणूस हा इतर सर्व पदार्थांपेक्षां, प्राणिमात्रापेक्षां, देवानं मोठा केला आणि खरोखरच मोठा श्रेष्ठ आहेस म्हणून. कसं तें पहा. माणूस दगडांना हवं तसं हालवूं शकतो, घडवूं शकतो, उपयोगाला आणूं शकतो. तूं हवे तसे दगड उचलून निवडून घेऊन आपल्या शेतांतली ताल, हद्दीचा गडगा, पाटाचा बांध, विहिरीची धाव, घराची भिंत, आणि देवळाचा गाभारा—फार काय त्यांतल्या देवाची मूर्ति घडवतोस. तूं शेतकरी बागवान. तेव्हां तूं बीं पेरून, झाडं वाढवून, त्यांना फुलंफळं आणवून, तीं खाऊन, शेवटीं झाडं वठलीं म्हणजे तीं तोडून जाळतोस, किंवा कापून घरकामाला लावून आपलं काम करून घेतोस ! बिचारे ते दगड, तीं झाडं, तुला हरकत करतात काय ? याच्यापुढं जाऊन तूं गरीब पक्ष्यांना पिंजऱ्यांत डांबून ठेवतोस. किंवा कोंबड्यासारख्या पक्ष्यांना खुराड्यांत

कोंडून घालून त्यांच्याकडून अंडीं घालवून तीं खातोस, किंवा स्वतः ते पक्षीहि मारून शिजवून खातोस. गरीब पशु असतील त्यांतल्या गाईम्हशींना दाव्याला बांधून ठेवून त्यांचं दूध काढून पितोस, आणि तीं मेलीं म्हणजे त्यांच्या कातड्यानं बूट जोडे वहाणा वाद्या तयार करतोस. कांही पशु मस्त किंवा क्रूर असले तरी त्यांची शिकार करून, मांस न आवडलं तरी त्यांचीं कातडीं सोलून मढवून, उपयोगाचे शोभेचे जिन्नस करतोस. मग सांग बरं, हे दगड वृक्ष पशुपक्षी उलट तुझं काय करूं शकतात? तेव्हां तूं सर्व निर्जीव सजीव पदार्थप्राण्यापेक्षां श्रेष्ठ कां नव्हेस? एकाच प्रकृतिमाईचीं सृष्टिमाईचीं लेकरं राहिलीं; पण एका तुझ्याच आणि तुझ्याच बायकोच्या हाडामासाचीं मुलं तीं तरी सर्व सारखीं असतात काय? मुळींच नाहीं. त्यांतला एक राजा होतो, दुसरा भिकारी होतो. एक विद्वान् पंडित होतो, तर दुसरा ठोंब्या निपजतो. एक साधु निपजतो तर दुसरा चोर दरोडेखोर खुनी निघतो. हाच दाखला एकाच सृष्टिप्रकृतिमातेच्या मुलांना लावावा म्हणजे तो बरोबर ठरेल. अरे तुझ्याच हाताचीं सगळीं बोटं सारखीं कुठं आहेत?'

'मग दादा हें मुळांत कसं झालं?'

'हें पहा, हे सर्व होण्याचे दोन विचार दोन प्रकार दिसतात. पहा तुला त्यांतला कोणता पटतो. एक विचार हा कीं हे सर्व भेद ईश्वरानं आपल्या लीलेनं—आपल्या मर्जीखातर खेळाकरितां करमणुकीकरितां—केले. पण ईश्वर खेळतो—करमणूक करतो—असं म्हटलेलं तुला पटत नाहीं असं तूं एक वेळ जाणवलंस. तेव्हां आतां उरला दुसरा विचार. तो हा कीं, हें सर्व आपोआप, कोणी न करितां, झालं. हा विचार तरी तुला पटतो का पहा.'

'ही सारी भानगडच दिसते, दादा. दुसऱ्यानं केलं म्हटलं तरी कठीण. आपोआप झालं म्हटलं तरी कठीण! एक मोठा एक लहान, एक गुणी एक अवगुणी, हा भेद ईश्वरानं करमणुकीकरितां केला हें म्हणणं पटत

नाहीं. पण हा सर्व भेद कुणी न करितां आपोआप झाले हें म्हणणं देखील या डोक्यांत शिरत नाहीं. पण दादा, झालं असं व्हावंच कां मुळीं निरनिराळं ?'

'मग सांगूं का यांतली तोड ? अशी कल्पना करावी कीं हे सर्व मूळ ईश्वराच्या मनांत होतं. पण तें सारं प्रत्यक्ष आपण न करितां, तें वाटेल तसं आपल्या सोईप्रमाणं करण्याची शक्ति व अधिकार, त्यानं प्रथम उत्पन्न केलेल्या प्रकृतीला देऊन ठेवला झालं !'

'दादा, एकाच घरच्या मुलांपैकीं कांहींचे गुण चांगले कांहींचे वाईट हें उदाहरण तुम्हीं दिलं तें पटलं मला. पण आईबापांची ममता मात्र सर्वांवर सारखी असते, निदान असावी, हें तरी खरं ना ? तशीच देवाची सगळ्यांवर ?'

'होय. तें आहेच खरं. पण तुम्ही आईबाप तेच असतां, आणि तुमची इच्छा तुमचीं मुलं निरनिराळ्या गुणांचीं निपजावीं अशी नसतां, तशीं कां निपजतात याचा विचार केला तर, तोच न्याय ईश्वराच्या विविध सृष्टीला लावतां येईल. तसंच एकाच नांगरानं नांगरलेल्या, एकाच कुळवानं कुळवलेल्या एकाच दिवशीं पेरलेल्या एकाच सांड्यांतल्या बियांतून, कोंब देंठ ताट कणसं आणि दाणे सारखेच येतात काय ? नाहीं. शिवाय आईबापांची माया ममता निरनिराळ्या मुलांवर थोडथोडी कमजास्त नसते हेंहि जसं तितकंसं खरं नाहीं, त्याप्रमाणं शेतकऱ्याची आपल्या पिकांच्या देंठावर ! मुलगा मिळविता आज्ञाधारक सद्गुणी असला तर त्याच्याकरितां आईबापांच्या डोळ्यांतून जितकं पाणी वाहावेल, तितकं मूर्ख दुष्ट दुर्गुणी व्यसनी उधळ्या त्रासदायक मुलाकरितां वाहवेल का तूंच सांग बरं ! तसंच अर्धं करपटलेलं रोप आणि तांबेरलेलं धाट किंवा कणीस, तूं सहज उपटून चुरगळून बैलापुढं टाकशील. तसं सतेज दाणेदार गच्च भरलेलं हिरवं कणीस तूं उपटून टाकशील का ? शेतांतल्या पिकांतलं धाटन् धाट तूं पेरलेलं म्हणून तुझ्याच मुलासारखं कीं नाहीं ? पण या सृष्टींत दगड तो दगड राहिला, अन् माणूस मात्र श्रेष्ठ पदाला चढला—सृष्टीचा लाडका सुपुत्र ठरला —याचं

कारण सांगणं कठीण असलं तरी, ईश्वराची दृष्टि सर्व प्राणिपदार्थांवर सारखी नाहीं असं मात्र म्हणतां येणार नाहीं. गीतेंत जिथंतिथं ईश्वरानं ही प्रगट घोषणा केली आहे कीं, सर्व सृष्टिमात्र माझं आहे माझ्यांत आहे. अन् मी त्याच्यांत आहें. दुसरं असं कीं, मनुष्याला मोक्ष देणारं जें ज्ञान म्हणून सांगितलं आहे तें हेंच कीं, सर्वांतर्यामीं एक ईश्वरच आहे हें ओळखणं. हा काय त्याच्या न्यायबुद्धीचा थोडा पुरावा झाला ? तो स्वत: तसं मानतो. माणसानंहि मानावं.'

'बरं, दादा, गीतेंत आणखी पुढं काय सांगितलं आहे ?'

'सृष्टीची उत्पत्ति वगैरे सांगतांना आपणा संसारी लोकांना कळण्या-करितां कळण्यासारखीच भाषा गीतेंत वापरली आहे. गीतेंतला ईश्वर म्हणतो—माया अविद्या या नांवाची माझी एक स्त्री आहे. तिचा मी पति आहें. माझ्यापासून तिला ही सृष्टि नांवाची मुलगी झाली. माझी स्त्री अविद्या माया ही तरुण आहे. ती अंगानं अफाट अमर्याद आहे. पण धरायला गेलों तर हाताला गवसत नाहीं. ती माझ्याजवळ असते. मी झोंपलों तरी ती जागी राहते. तिला आठ विकार आहेत. त्यांनीं तिचा गर्भ समृद्ध राहून वाढतो ! पेरलेल्या बियाला पाणी भेटतांच त्याला अंकुर उपजतो तसं मायेच्या पोटीं मला चार तोंडाचं मूल झालं. त्याला तोंडा-प्रमाणं चार अंगंहि आहेत. त्या मुलावर प्रेम करून ती माया त्यांना अंगावर दूध पाजते. त्यांच्या अंगावर दागिने घालून ती त्यांना शृंगा-रते. या बाळाला पहिला खेळगडी अहंकार नांवाचा भेटला. त्यानं त्या मुलाला ' हा मी, तो मी नव्हे. हें माझं, तें माझं नव्हे. ' असं मानायला म्हणायला शिकवलं. तसंच सत्त्व रज तम या नांवाचे तीन गुण याच प्रकृतीनं त्या माणसांतच उत्पन्न केले. आणि तो अहंकार आणि ते तीन गुण यांच्या कारणानं सृष्टीचा हा सगळा खेळ सुरू आहे.'

' अन्, दादा, हा खेळ संपणार का कधीं ?

'होय. आपल्या जुन्या लोकांची जी समजूत तीच गीतेंत आहे. ती ही कीं हा मायेपासून उपजलेल्या सृष्टीचा खेळ मांडला जातो तसा तो पुढं

केव्हां तरी आवरला जातो. खेळच तो. फिरून म्हणशील, देव पोरासारखा खेळतो का ? पण खेळतो असं म्हणावं लागतं खरं, गड्या ! आणि खेळ म्हटला म्हणजे तो मांडला तसा आवरला जायचाच. आणि टोपलींतलं एकेक चित्र बाहेर काढून मांडून खेळ सुरू होतो तसा, तें एकेक चित्र परत टोपलींत भरून खेळ आवरला जातो. आठवड्याचा बाजार नाहीं का तूं पाहिलास आपल्या गांवचा ? तो कसा सकाळपासून भरत जातो, आणि संध्याकाळीं मोडत जातो ! गीता म्हणते कीं, हा मायेचा बाजार असाच पूर्वी अनेक वेळां भरून संपला आहे, आणि पुढंदेखील पुनः पुन्हां असाच भरून संपेल. दर आठवड्याला तुझ्या बाजारच्या गांवीं हें होतंच ना ?'

'अन्‌ दादा, तुमची आमची काय वाट ?'

'वाट काय ? नाटकप्रयोग तोच तो पुन्हां झाला म्हणजे तींच तीं माणसं, तींच तीं सोंगं घेऊन, पुन्हां पुन्हां रंगभूमीवर येऊन तींच तीं कामं करतात. त्याप्रमाणं अशाच पुढच्या एखाद्या खेळांत तूं आणि मी असेच जन्माला येऊन आजच्या सारखेच गीतामाईविषयीं असेच या ठिकाणीं बोलत बसलेले असूं.'

'म्हणजे मी असाच मुंबई सोडून आपल्या या गांवीं येऊन राहीन ? तुम्हीहि असेच या गांवीं हवा खायला याल ? मी तुम्हांला असेच गीतेविषयीं वेड्यासारखे प्रश्न विचारीत राहीन ? आणि तुम्ही मला अशींच शहाणपणाचीं समाधानाचीं उत्तरं देत रहाल ? मौजच आहे म्हणायची ?'

'अरे, कल्पना केली कीं सगळी मौजच. पण पुढच्या युगांत पुन्हां अगदीं हाच प्रसंग घडायचा झाला तरी, तुला मला या जन्मीच्या या प्रसंगाची आठवण कुठून राहणार ? स्मरण बुजलं की सर्व नवंच नव्हे का ?'

'होय दादा, पण इतकंच थोडं वाटलं कीं हें जग बुडून फिरून जर पुन्हां उत्पन्न व्हायचं असलं, तर या जन्मांत झालेल्या चुका दुरुस्त करायला संधि कां मिळूं नये ? तेंच तें नेमकं पुन्हां कां घडावं ? वेगळंहि कां नाही ?'

' तुझी अपेक्षा बरोबर आहे. पण नवी सृष्टि निर्माण होते ती पहिल्याचीच तंतोतंत आवृत्ति असते कीं, प्रत्येक वेळीं कांहीं नवी घटना घडण्याला त्यांत मोकळीक असते, हें कोण सांगणार? पण समज, आपण रहाटाच्या चाकाला बांधलेले आहों आणि तें चाक फिरतं आहे. तर दरएक फेऱ्याला आपण आहों तिथं आहों, आलों तसेच येणार राहणार दिसणार असं नाहीं का ठरत? ईश्वराला झालं तरी क्रमाचं कांहीं बंधन आहे कीं पूर्ण स्वातंत्र्य आहे कुणीं सांगावं? पण अशा मोठ्या कल्पनांत मन न गुंतविलेलंच बरं. तुला गीतेंतलं सांगत होतों तें हें कीं, ईश्वरानं मायेच्या पोटीं ज्या सृष्टीला जन्माला घातलं, तिच्यांतून खालीं खालीं उतरत गेलं कीं वेगवेगळेपणा आढळतो. पण उलट वर वर जाऊं लागलं कीं तो वेगळेपणा नाहींसा होऊन सगळं सारखं अन् एक जिनसी आढळूं लागतं. म्हणून माणसानं या दोन्ही गोष्टी समजून घ्याव्या. आणि सगळं जग हाच ईश्वर, आणि ईश्वर हेंच सगळं जग, असं ज्ञान ज्याला झालं त्याला मुक्ति मिळते.'

' पण दादा, हें असलं ज्ञान माणसालाच तेवढं होईल, झालं तर कदाचित्. अन् त्यालाच मिळणार मोक्ष! म्हणजे सगळी गीता देवानं माणसाकरितांच सांगितली म्हणायची! आणि मोक्ष सुद्धां त्याच्याच करितां? त्यांत इतर पदार्थप्राणी यांना कांहीं जागा नसावीच का?'

' नसावी असं कोण म्हणतो? पण गीतेंत असं सांगितलं आहे कीं, मनुष्याखेरीज जे इतर प्राणी त्यांना, आज माणसांचा जन्म नसला तर, तो पुढं केव्हां तरी येण्याचा संभव असतो. चौऱ्यांशी लक्ष जीव योनी सांगितल्या त्यांचा फेरा असतो. म्हणजे तोच आत्मा आज पक्षाचं रूप घेईल तर कदाचित् उद्यां मनुष्याच्या जन्माला जाईल. आणि फिरून हें कीं, वर जें हें मोक्ष देणारं ज्ञान म्हणून सांगितलं तें एकाच माणसाला झालं तरी एकाच जन्मांत मिळेल असं नाहीं, त्यालाहि तें होईपर्यंत अनेक जन्म घ्यावे लागतील. किंवा अनेक जन्म घेऊनहि तें होणार नाहीं. म्हणून तूं आतां मनुष्याशिवाय इतर प्राण्यांची कल्पना मनांतून काढून

टाक कशी! ईश्वरानं अन्याय केला, पक्षपात केला, ही कल्पना काढून टाक, आणि मोक्षाच्या शाळेंत वरच्या शेवटच्या वर्गांत परीक्षेचा अभ्यास करणारा, व ती 'पास' होऊन मोक्ष मिळविण्याची अपेक्षा इच्छा करणारा, असा जो कोणी मनुष्यप्राणी त्याला उद्देशूनच गीतेंतलं ज्ञान सांगण्यांत आलं आहे, असं एकदांच कायमच समजून चाल. म्हणजे मग तें ज्ञान काय सांगितलं आहे यावरच तुझं लक्ष कायम होऊन राहील.'

'मग सांगा कीं दादा, मलाहि तें ज्ञान थोडसं. माणसाकरितां तें सांगितलं आहे ना? मीहि माणूसच आहे. पण माणसामाणसांत बुद्धीनं फरक पडतो हां! मी हा असा निर्बुद्ध आहे. म्हणून माझ्याकरतां थोडं सोपं करून सांगा इतकंच काय तें.'

## संवाद ९ वा

'गोनबा, तूं माझ्या इतकं संस्कृत इंग्रजी शिकलेला नसशील. पण म्हणून तूं निर्बुद्ध आहेस असं मी मानीत नाहीं. आणि तूंहि मानूं नको. तें ज्ञान ज्ञान तरी असं अवघड काय आहे? आणि आहे तें सोपं करून गीतेंतच सांगण्याचा यत्न दाखले देऊन केला आहे. तसाच ज्ञानेश्वरासारख्या टीकाकारांनीं वर्णिलेल्या या ज्ञानाचा एक भाग मघाशीं तुला सांगितलाच. तो हा कीं, ईश्वर हा स्वतःच जन्मलेला. त्याला कोणी दुसऱ्यानं उत्पन्न केलेलं नाहीं. त्या ईश्वरानं प्रकृति निर्माण केली. तिला माया असं वेदांती म्हणतात. आणि दुसरे कोणी सांख्य म्हणून तसेच विद्वान आहेत ते म्हणतात कीं, ईश्वरानं प्रकृति निर्माण केली हें खरं नाहीं, तर ईश्वर म्हणजे पुरुष आणि प्रकृति म्हणजे स्त्री हीं दोनहि एकदमच उत्पन्न झालेलीं स्वयंभू आहेत. पण या प्रकृतीपासून सृष्टि उत्पन्न झाली हें मात्र दोघांना सारखंच मान्य आहे. वेदांती लोकांच्या मताप्रमाणं,

ईश्वर-पुरुषानं, माया-प्रकृति—स्त्रीच्या ठिकाणीं, सृष्टि ही प्रजा उत्पन्न केली. अगदीं थेट संसारांतल्या स्त्रीपुरुषांच्या प्रमाणं एकत्र येऊन! दुसरे म्हणतात कीं, प्रकृति हीच आपल्या सामर्थ्यानं सृष्टि उत्पन्न करिते. तिला त्यावेळीं ईश्वर पुरुष हा संनिध पण फक्त पाहण्याला असावा लागतो. आणि पुढचा ज्ञानाचा धडा हा कीं, अशा प्रकारं सृष्टि ही उत्पन्न झाली असली तरी ती व ईश्वर कांहीं दोन नाहींत. ईश्वराच्या दोऱ्यांत सृष्टीचे मणी ओवले आहेत हा दृष्टांत स्वतः गीतेंतलाच आहे. एकाच सोन्या-रुप्याच्या गोळ्यांतून, ईश्वरी टांकसाळींत, विविध अनंत पदार्थरूपी जीव-रूपी मूर्ति हीं नाणीं निर्माण होतात हा दाखला ज्ञानेश्वरींतला आहे. आणि तसाच दुसरा एक दाखला गीतेंत आहे तो सृष्टिविस्तार कसा झाला हें दाखविणारा आहे. तो दाखला अश्वत्थवृक्षाचा आहे, झाडाचा आहे, म्हणून तो तुला शेतकऱ्याला चांगला समजेल. तो दाखला असा. संसार ( प्रकृतीपासून झालेल्या सृष्टीचा विस्तार ) हा एक मोठा, कधीं न नाश पावणारा असा, प्रचंड वृक्ष आहे. मात्र याचीं मुळं नेहमींच्या वृक्षासारखीं खालच्या बाजूला नाहींत, तर तीं वर वाढलीं आहेत! आणि याच्या फांद्या खालीं वाढल्या आहेत! त्यांचा कोणाला अंत लागत नाहीं. इतर वृक्षांच्या मुळाशीं बुडख्याशीं कुऱ्हाडीनं घाव घातले असतां ते वरच्या फांद्या फळ पान यांच्यासह तुटून पडतात. पण या संसार वृक्षाचं तोंडच उलटं! तेव्हां त्याच्या मुळाला कुऱ्हाड कोणती कशी पोंचणार? आणि वृक्ष समूळ छाटला तोडला जाणार? याला फिरून दाखला सूर्याचा. सूर्याचं बिंब व त्याच्या किरणांचं मूळ हें आभाळांत, आणि किरणांचं जाळं खालीं जगभर पसरलेलं! या वृक्षाला फळ नाहीं फूल नाहीं. जें कांहीं आहे तें सर्व वृक्षच आहे. हा वृक्ष उलटा, म्हणून उमळून खालीं डोकं वर पाय होऊन पडत नाहीं. तर हा वर रुजून खालीं वाढत गेलेला असाच अपूर्व आहे. याच्या फांद्यांना फिरून खालीं पारंब्या फुटल्या आहेत. या अपूर्व वृक्षाला मरण नाहीं असं म्हणोत. पण कांहीं एका युक्तीनं त्याचाहि नाश होऊं शकतो. अज्ञान हेंच या संसार वृक्षाचं पहिलं मूळ आहे. वरून खालीं या झाडाच्या

अग्रांचे जुंबाडे आले म्हणजे त्यांत महत् तत्त्व नांवाचं कोवळं पान येतं. त्याला तीन पानांचा शेंडा फुटतो. त्यांतून अहंकार, व मग पृथ्वी, तेज, वायु, आकाश, पाणी या पंच महाभूतांचा एकवटलेला दांडा निघतो. मग त्याला पांच ज्ञानेंद्रियं व निरनिराळ्या गुणयुक्त विषयांचीं पानं फुटतात. मग त्यावर आशेचं कांड निघतं. मग त्यांतून भ्रमाचे तंतू निघतात.'

'आणि दादा, या अपूर्वाईच्या झाडाचं शेवटीं काय होतं हो? तो फार वर्षांनी आपोआप जून होऊन वाळून वठतो? कीं, त्यावर कुऱ्हाड घालून तो कुणी देवा घरच्या इमारती लाकडाकरितां जळणाकरतां तोडतात? कीं, तो एखाद्या वादळांत डोक्यावर वीज पडून कोसळून पडण्याची वाट पाहतो? होतं तरी काय या वृक्षाचं शेवटीं?'

'प्रथम फार काळपर्यंत असं घडत जातं कीं, या महावृक्षापासून जें जें खालीं पडतं त्याला फिरून फूट येते. यामुळं वाटतं कीं तो कधींच नाश पावणार नाहीं. पण हें अज्ञानी माणसापुरतं. ज्ञानी मनुष्य हें समजून असतो कीं, हा वृक्ष अविनाशी दिसला तरी तो केव्हांतरी नाश पावणाराच आहे. आपण होऊनच नाश पावेल.'

'असं आहे तर नाश पावणार नाहीं असं कां वाटतं?'

'अरे तो भ्रम असतो. असं पहा कीं, कुंभाराचं चाक फिरतांना किंवा भिंगरी फिरतांना पाहिली कीं कुणाला वाटेल का, कीं ती थांबेल म्हणून,? पण प्रथम फिरवितांना तिला दिलेला वेग संपला कीं तें चाक ती भिंगरी थांबतेच कीं नाहीं? त्यांतल्यात्यांत दुसराहि एक भ्रम असा पडतो कीं, चाक भिंगरी अतिशय वेगानें फिरत असल्यामुळं तिचा फेराच लक्षांत येत नाहीं आणि ती स्थिर आहे असंच वाटतं. पण १ ती स्थिर आहे किंवा २ एकदां फिरूं लागली कीं थांबायचीच नाहीं, हे दोनहि भ्रम असून ते खोटे ठरतातच. आणि शेवटीं होतं काय कीं, या प्रचंड वृक्षाच्या डहाळ्या फांद्यावर वाढलेल्या वेलींचीं जाळीं एकमेकांवर घासूं लागतात. तो वृक्ष फोफावला म्हणजे आपल्या जड भारामुळं डुलूं लागतो. त्यांतूनच आपोआप वारा उत्पन्न होतो. आणि या डोलण्यानं घासघासून त्यांतनच

आग उत्पन्न होते. मग तो मधून मधून जळल्यानं त्याचे तुकडे पडूं लागतात.'

'पण हें झाड तुटलं पडलं नाहींसं झालं असं फार फार फार पुढं केव्हां तरी दिसणार! तोंपर्यंत माणसान कसं म्हणावं कीं, असलं हें देवाघरचं भलतच इपरित झाड नाहीस होणार आहे म्हणून? चांद सूर्य कधी नाहीसे होतील अशी कल्पना तरी करितां येईल कुणाला?'

'अरे हो! कलियुगांत शास्त्री लोकांची एक नवी जात निघाली आहे. ते म्हणतात 'चंद्र सूर्य हे देखील पुढं नाहींसे होणार आहेत.' पण चुकलों. एका जुन्या ऋषीनं उपनिषदांतच म्हटलं आहे 'एक वेळ असा येईल कीं समुद्र आटतील पर्वत नाहींसे होतील.'

'अन् दादा, चांद सूर्य आभाळांतून गेले म्हणजे उजेड कसा दिसेल अन् उन कसं पडेल?'

'व: त्यांत काय झालं? अमावास्येच्या रात्रीं सर्व काळोखच असतो कीं नाहीं? आणि आपल्या घरीं विस्तव काय आठहि प्रहर पेटलेला असतो? कांहीं गरीबांच्या घरीं तर विस्तव साऱ्या जन्मांत पेटत नाही. तात्पर्य काय?— जें पुढं घडणार त्याची कल्पना जाणत्या माणसाचं मन आधींच करूं शकत कीं! आणि ज्याचं मन अशी आगाऊ कल्पना करूं शकेल तोच ज्ञानी म्हणावा. मग आतां बोल, कसं झालं या सृष्टीचं वर्णन, वृक्षाच्या रूपानं? मात्र वृक्ष विपरीत!'

'ठीकच आहे कीं दादा. हें झाड काय पृथ्वीवरचं आहे? देवाघरचं झाड. त्याचं मूळ देवाघरच्या अंगणांतच उगवायचं कीं! पण देवाची जगावर ममता माया म्हणून त्याच्या फळाफुलांचा सडा पडायचा मात्र उलटा जगाच्या अंगणांत. आतां आली कल्पना मला जग कसं काय झालं अन् वाढलं याची थोडीशी. दाखल्याशिवाय माझ्यासारख्या गांवढळाला असलं कसं समजणार? बरे तुम्ही भेटलां रिकामे समजून सांगायला.'

'पण हें आणखी लक्षांत ठेव कीं वेदांती लोकांच्या मताप्रमाणं,

सृष्टीचा संसाराचा अश्वत्थवृक्ष उगवून वाढतो असं मानणं हा सुद्धां भ्रमच होय. निदान असं खरं कीं, माणसानं प्रयत्न करून हा संसार खोटा आहे असं मनानं मानायचं ठरवलं तर त्याला तसंहि करतां येईल.'

'तें नाहीं, दादा, माणसाला व्हायाचं! जें दिसतं तें केव्हां तरी पुढं नाहीसं होईल, नाहीसं झालंच पाहिजे, येवढंच समजायचं असलं तर तें सोपं आहे. अनुभवच तसा आहे. जगांतलं माणूसच आपण घेऊं. कुणीहि माणूस दिसला कीं मनांत खुशाल म्हणावं कीं हा बिचारा पुढंमागं केव्हां तरी मरणार! पण डोळ्याला दिसतो तो माणूस, तो दिसतो तेव्हांहि, मुळांत नाहींच असं कसं म्हणावं तें नाहीं ध्यानांत येत. दिसती सृष्टि पिरथिमी, ती मूळ देवानं केली म्हणून देवाची, फार काय देवच असं म्हणायचं अवघड वाटत नाहीं. आईबाप आजा–पणजा निरनिराळे झाले तरी ते एकांतन एक निघालेले, घराण्याचं नांव एक, रगत एक. म्हणून ते सगळे एकच म्हणावे. तसं जग अन् देव एकच असं मी मानीन म्हणेन. पण ज्याचं येवढं वर्णन आतांच केलंत दादा, तें जग खोटं आहे, मुळांत नाहींच मुळीं, मानीव आहे हें या बथ्थड डोक्यांत नाहीं शिरत, दादा.'

'तूं म्हणतोस तें खरं आहे! मला तरी कुठं कल्पना करतां येते कीं, ज्या जगांत मी वावरतों तें जग खोटं आहे अशी? पण गीताशास्त्र काय म्हणतं तें मीं वाचलेलं म्हणून तुला तें सांगतों इतकंच. एरवीं तूं मी एवढंच काय, तें गीताशास्त्र लिहिणारा, सगळे एकच आहोंत. एकानं विचार करून लिहावं, दुसऱ्यानीं त्याचा मोठेपणा लक्षांत घेऊन तें मानावं किंवा मानलं म्हणावं इतकंच. जग खोटं असून त्यांत राहणारे वावरणारे हे सर्व स्वप्नभ्रमांत असले तर, गीता लिहिणाऱ्या सुद्धां आपण सर्व स्वप्नांतच आहों. उलट जग खरं असलं, तर आपण खरे आहोंच आहों.'

'पण जें पाहतों तें खोटं कसं म्हणावं दादा? कांहीं कळत नाहीं.'

'कसं तें सांगतों, पण तें त्यांचं म्हणणं म्हणून. माझं म्हणून नव्हे. आपणाला जागेपणींहि स्वप्न पडत नाहीं असं नाहीं. अन् झोपेंत तर तें पडतंच. स्वप्नांत आपण काय पाहतों करतों? तर जें प्रत्यक्षांत आपण

पहात नसतों, करीत नसतां तें. पण त्या वेळेपुरतं तें आपणाला खरं वाटतंच कीं नाहीं ?'

'होय, दादा. स्वप्नांत वाघ दिसला तरी आपण भिऊन ओरडून मारलेली हांक प्रत्यक्ष आपल्या तोंडांतून बाहेर पडते. शेजाऱ्याला ऐकायला जाण्याइतकीहि. अंगाला खरोखरीच घाम फुटतो.'

'ठीक. मग जें नाहीं तें जर खरं भासतं तर, उलट जें खरं आहे तेंहि, प्रयत्न केला असतां, खोटं असं मनाला भासवायला काय हरकत ? फरक इतकाच कीं स्वप्नांतल्या गोष्टी आपण इच्छा नसतांना, प्रयत्न न करतां, पाहतों. म्हणजे दिसतात. तसाच प्रयत्न केला तर डोळ्यापुढं दिसतं तें नाहीं असंहि मनाला मानतां भासवितां येईल कीं ! फिरून म्हणतों कीं प्रयत्न केला तर !'

'होय, डोळे मिटावे म्हणजे झालं !'

'नाहीं डोळे मिटले तरी अंतर्दृष्टिपटावर चित्र राहतंच. तें जर नाहीं असं वाटायला हवं तर, मनानं तितका जोराचा प्रयत्न करून, अंतर्दृष्टिपटावर दिसणारंहि पुसून टाकलं पाहिजे. योगी लोक असं करूं शकतात म्हणे ! आपणालाहि यावं.'

'पण हा नुसता उपद्व्याप नव्हे का दादा ? प्रयत्न करून संसार जग खरोखरच कायमचं नष्ट करतां आलं असतं तर एक गोष्ट वेगळी. सगळी भानगड तरी एकदाची मिटेल. पण तो क्षण गेला कीं, आपण पुन्हां खऱ्या व्यवहारांत पडायचं आणि मागचं पुढं चालू व्हायचं.'

'आलं लक्षांत. पण आहे तें नाहीं असं भासविण्याचा दुसरा एक प्रकार आहे, त्यांत डोळेहि मिटावे लागत नाहीत.'

'तें कसं दादा ?'

'तें असं कीं, जें दिसतं तें दिसेना का ! पण जें दिसतं त्याच्यावरचं आपलं प्रेम कमी झालं, संपलं, तर तें असून नसून सारखंच ना ! समज एखादा मुलगा अगदीं वाह्यात निघाला तर तो बापाला नकोसा वाटू लागतो. पण तो नकोसा म्हणून नाहींसा करण्याकरितां जीव घेत नाहीं

त्याचा. फार तर 'तूं यापुढं मला मेल्यासारखा आहेस. मी तुला मेलों. मला तूं मेलास!' असं म्हणून त्याच्याशीं असणारे संबंध व व्यवहार बाप तोडतो. आणि एखाद्याशीं संबंध, त्याच्या विषयींचं प्रेम, जिव्हाळा तुटला म्हणजे मग तो आपणाला असून नसल्यासारखा झाला कीं नाहीं? गीता सांगणारानं जगाची सृष्टीची उत्पत्ति येवढी साक्षेपानं सांगितली, तिचा विस्तार सांगितला, तिचं वर्णन केलं, व फिरून तें सर्व खोटं असं सांगायला तो सरसावतो. याचा अर्थ, आतां सांगितलेल्या स्वतःच्या मुलावर नाराज झालेल्या बापाच्या दाखल्यावरून घ्यायचा आहे. अन तो घ्यावा असंच सांगण्याचा हेतु आहे.'

'हें तर भलतं वाटतं दादा. सारं स्वप्नच कां म्हणाना, पण स्वप्नांत झालं तरी खरे संबंध असतात ते तुटत नाहींत. स्वप्नांत आपणाला साप चावतोसा दिसला तर तो मारावासा वाटणार; आणि मारायला हात उचलणारच. वाघ मागं लागला असं दिसलं तर पायांना पळावसं वाटणारच. म्हणजे जें आहे, मागून घेतलं आहे, मिळविलं आहे, मिळालं आहे, तें संसाराच्या रीतीनं नीट करावं असं माणसाला सांगण्याऐवजीं, त्याकडचं लक्ष काढ असं कुणीं सांगितलं, आणि तसं कुणीं केलं, तर भलतंच व्हायचं. मग कोणता काम धंदा कसा नीट होणार? तडीला लागणार? त्यांतन मिळायचा तो लाभ कसा मिळणार? सुख कसं मिळणार? जग हें स्वप्न मान, खोटं मान, असं सांगून पटलं तर जग हा वेड्यांचा बाजारच नाहीं का होणार? किंवा कांहीं करायसवरायला हात तरी कसा उचलणार?'

'ठीक विचारलंस. जग हें स्वप्न मान असं सांगणारे सांगत आले, ऐकणारे ऐकत आले. इतकंच. पण व्यवहार हा सर्वस्वीं खोटा असं मानून तो करायचा सोडला कुणी? मात्र स्वप्नाचा दाखला मनांत बाळगलाच तर माणसाचा स्नेहसंबंध, वस्तूचा कामाचा बंध, किंचित् ढिला पडतो यांत मात्र कांहीं शंका नाहीं. आणि तो बंध किंचित् ढिला पडावा हें इतकंच सांगण्याचा सांगणाराचा हेतु असावा. पण तें आतां इतकंच राहूं दे. सृष्टीच्या

उत्पत्तीचं आपण बोलत होतों तें तेवढं पुरं करूं या. मग हा दुसरा विषय त्याच्या पुढं येणारच आहे. गीतेंत झालं तरी अगदीं एका पुढं एक असं वाचीत गेलं तर कित्येक वेळीं तात्पर्य सुसंगत रीतीनं ध्यानांत येत नाहीं. म्हणून मागचं पुढं पुढचं मागं घेऊन सगळं मिळूनच सांगावं लागतं. ' बरं आतां आठवण करून सांग कीं, सृष्टीच्या उत्पत्तीविषयीं बोलतांन कुठवर आपण आलों होतों ?'

' हां, सांगतों आठवतं तें. ईश्वर झाला म्हणा, होताच म्हणा. त्यानं प्रकृति कीं काय ती तिला घेऊन, आपण किंवा तिच्याकडून, हें सगळं जग घडविलं असं सांगितलंत. मग भुइ जमीन पाणी वारा आग झाल्याचं सांगितलंत. मग जीव नसलेलीं जीव असलेलीं कशीं झालीं हें सांगितलंत. मग मुंबईच्या टांकसाळीचा आणि तिच्यांतन निघणाऱ्या नाण्यांचा दाखला सांगितलात. मग चौऱ्यांयशी का कितीशा जन्माचं योनींचं सांगितलंत. मग त्यांत माणसाला सर्वांच्या डोक्यावर बसवून तो मोठा म्हणून सांगितलंत. मग देवाच्या घरनं निघालेल्या एकंदर जगाची कल्पना यावी म्हणून, उलट्या तोंडानं उगवणाऱ्या वाढणाऱ्या पिंपळाच्या झाडाचा दाखला दिलात. माळेंतल्या मण्याप्रमाणं हें सर्व जग ईश्वराच्या सुतांत ओंवलं असं सांगितलंत. जग अन् ईश्वर हे बापलेकाप्रमाणं एकच म्हणून सांगितलंत. अन् प्रथम अगदीं खरी गोष्ट सांगण्याचा आव आणून शेवटी, ' इतकं पाहून जागा झालों !' अशा शब्दानीं, ऐकणाराचा विरस करून थट्टा करावी त्याप्रमाणं, हें सगळं जग खोटं मानावं असं सांगितलंत कीं दादा !'

' अरे वा : तूं तरी बरंच लक्षांत ठेवतोस. ठीकच आहे. तूं एरवीं शिक्षण घेतलं नाहींस म्हणून तुझ्या स्मरणाची स्लेटपाटी कोरी आहे. तिच्यावर अक्षरं स्वच्छ ठळक उठतात. माझ्यासारख्या भाराभर ग्रंथ वाचणाऱ्याच्या स्मरणाची पाटी गिजबिट चिताड असते. असो. आतां सृष्टीचा क्रम पाहतां आपण माणसापर्यंत आलों. पण उरली गीता तीहि सगळी माणसा-करितांच सांगितली आहे. म्हणून आतां, बाकीची सर्व स्थावर जंगम,

हलणारी न हलणारी, सृष्टि विसरून जाऊन, माणसाविषयीं काय सांगितलं आहे तें पाहूं. त्यांत पहिलं हें सांगितलं कीं, सृष्टि ही उत्पन्न करतांना तिच्यामध्यें ईश्वरानं तीन मुख्य गुण ठेवून दिले. अर्थात् इतर सृष्टीबरोबरच माणसांतहि. आणि या तीन गुणांच्या कारणानं माणसाचं चरित्र कसं होतं हें पाहूं.'

## संवाद १० वा

दुसरे दिवशीं फिरून आम्ही बोलायला ठाण मांडून बसलों तेव्हां मी म्हणालों 'काल जे तीन गुण म्हणून सांगितले त्यांचीं नांवं अशीं-सत्वगुण रजोगुण तमोगुण.'

हें बोलतों इतक्यांत थोडा अडथळा आला. पलीकडच्या गोठ्यांतून गड्याचं ओरडणं, काठी हापटल्या मारल्याचे आवाज, गोठ्याच्या फळ्यांना गुरांच्या लाथा शिंगं यांचे तडाखे बसल्याचे आवाज, ऐकूं आले. त्याबरोबर गेनबा उठून तिकड धांवत गेला. थोड्या वेळानं परत आल्यावर मीं त्याला विचारलं 'गेनबा, काय रे झाली गडबड गोठ्यांत?' गेनबा किंचित् दमल्यामुळं हुःश करून खालीं बसून स्वस्थ झाल्यावर म्हणाला 'तरी मी सांगत असतों धाकल्याला कीं, गुरं फोडून वेगवेगळीं बांध. आज त्यांनीं कहर केला. ती अंधी एक डोळी मारकट तांबू गाय, तिन दावं तोडून घेऊन, उगीचच ढवळीच्या अंगावर जाऊन, तिला शिंगानं रक्त निघेपर्यंत मारलंन. काय त्या ढवळीचा गुन्हा? ती खालीं बघून गवत खात होती. तिनं तें सगळं निमूटपणं सोसलं.'

'आणि त्या दोघींच्यामध्यें बांधलेला गोंद्या पाडा तो काय करीत होता? (मला आतां गुरांचीं नांवं अन् त्यांच्या गोठ्यांतल्या बांधण्याच्या जागाहि पाठ झाल्या होत्या.)'

गेनबा म्हणाला ‘ तो लबाड ! तो दूर जाऊन पेंडीचे खडे मी रचून ठेवतो तिथं खुशाल खात होता.’

मी हेंच वर्णन जमेला घेऊन म्हणालों. ‘असो, गुरंच तीं. पण त्या तीन गुणांचीं नांवं मगाशीं सांगितलीं तीं आतां पुन्हा म्हण पाहूं.’

गेनबानं किंचित् आठवण करून म्हटलं ‘ सत्व रज अन् तम ’

‘ ठीक ’ मी म्हणालों, ‘ मार खात उभी राहिली, उलट शिंग हलीवलं नाहीं पण भ्यालीहि नाहीं, ती तुझी ढवळी गाय हें सत्व गुणाचं उदाहरण झालं. गोंद्या पाडा स्वार्थसाधू. लांब जाण्याचा आणि पेंड हुडकून खाण्याचा उद्योग करणारा हा पाडा रजोगुणाचं उदाहरण समज. आणि कारण नसतां केवळ मारक्या स्वभावामुळं, स्वतः अंधी असतां, उलट मार बसेल या कल्पनेला न भिऊन, ढवळीच्या अंगावर जाऊन द्वेष उगविणारी ती तांबू गाय हें तमोगुणाचं उदाहरण. घ्या, बसल्या जागीं उदाहरणं आयतीं मिळालीं !’

‘ पण दादा, चांगल्या अन् वाईटाला दोघांनाहि गुण म्हणायचं ? ’

‘ बरोबर विचारलंस. पण गुण हा शब्द नुसता शास्त्रांतला आहे. म्हणून तो चांगल्या प्रमाणं वाईटालाहि लावतात. गुण म्हणजे अंग-स्वभाव. स्वभाव हा एकच शब्द चांगल्याप्रमाणं वाईट स्वभावालाहि लावतातच कीं नाहीं ? त्याचं असं आहे बघ कीं, ईश्वरानं प्रकृतींतून सृष्टि निर्माण केली. तिच्या ठिकाणीं हे तीन गुण प्रथमच उत्पन्न करून ठेवले. यामुळं त्या प्रकृतींतून निर्माण झालेल्या प्रत्येक पदार्थाला एक एक गुण मुख्य म्हणून चिकटला. कुणाला कोणता याचं कारण मात्र सांगतां येत नाहीं. पण मनुष्य हाच मुख्यतः डोळ्यापुढं ठेवून ही सगळी गीता लिहिली असल्यामुळं, त्या गुणांचा विचार, ते सगळे माणसाच्या अंगचे गुण असं समजून केला आहे इतकंच. ’

‘बरं मगाशीं दिलींत तीं झालीं गुरांच्या गुणांचीं उदाहरण खरीं. आतां माणसांचं थोडं बोलाना. ’

‘ ऐक तर. आपल्या ज्ञानेश्वर महाराजांनीं याचा चांगला खुलासा केला

आहे. सत्त्वगुण उत्तम, रजोगुण मध्यम, तमोगुण अधम हीन कनिष्ठ आहे. एकाच शरीराला बालपण तारुण्य व म्हातारपण यांचा अनुभव येतो तसा, एकाच मनामध्यें सत्त्व रज तमो गुणांचा आविर्भाव होऊं शकतो. मात्र तो एका मागून एक अशा क्रमानं नव्हे. कोणचाहि गुण कोणत्या एखाद्या कारणानं भलत्याच वेळीं अकल्पितहि प्रगट होऊं शकेल. तथापि मनुष्याचा आत्मा या तीन गुणांनीं (दोऱ्यांनीं—दाव्यांनींच म्हणेनास) बांधलेला असतो. त्यांतली एखादी दोरी आतां तर एखादी दोरी मग कमी अधिक घट्ट किंवा सैल होते इतकंच. आत्म्यानं 'हा देह माझा' असं म्हटल्याबरोबर, त्या देहाला चिकटलेले हे सत्त्व-रज-तम गुण आत्म्याभोंवतीं गुंडाळले जातात. पाण्यांतल्या माशाचं तोंड गळाच्या माशीला लागलं कीं तें कोळ्याला समजतं, आणि त्याबरोबर तो धक्का देऊन गळाचं टोंक माशाच्या तोंडांत घुसवितो, तसं हें घडतं. मी सुखी आहें मी ज्ञानी आहें असं माणसाला वाटतां क्षणींच, सत्त्व गुण माणसाच्या आत्म्याला बांधतो. पण सुख लाभलं ज्ञान झालं तरी त्याची बाधा होऊं देऊं नये. रजोगुणाचें कार्य असं कीं, त्यानं मनुष्याचं मन विषयांत रमून जातं. यामुळं माणसाला लोभ इच्छा मनोरथ यांची बाधा होते. इच्छेच्या घोड्यावर तो चढतो, धावूं लागतो. दुःख सुद्धां ईर्षेमुळं गोड वाटूं लागतं. तें त्याच्या खिसगणतींत येत नाहीं. स्वर्गाला गेलों तरी तिथंहि अमुक सुखं मिळावीं अशा इच्छेनं त्यानं केलेले यज्ञ व्रतं इत्यादि धार्मिक कर्मं देखील रजोगुणाचींच फळं असतात. रजोगुणी माणसाचं मन नेहमीं चंचळ राहतं, त्याला विश्रांति नसते. तमोगुणाला प्रथमतः अज्ञानाचा व भ्रमाचा मोठाच आधार. मोहवश होऊन तमोगुणी माणूस मूर्ख, झोंपाळू, आळशी, दुराचारी, आडमुठा, हट्टी, अविवेकी, करूं नये तें करणारा, धोके खाणारा, चुका करणारा असा असतो. असे हे तीन गुण एकमेकांशीं स्पर्धा करून माणसावर आपलाच ताबा अधिक व्हावा असा प्रयत्न करितात.'

'आणि या युद्धांत तुमचा सत्त्वगुण विजयी झाला तर काय होतं?

‘ सांगतों ऐक. वसंतऋतु आला असतां फुलांतला सुवास पाकळ्यांना सारून बाहेर येतो त्याप्रमाणं बुद्धि फोंफावून, चांगल्या वाईटाची निवड होऊन त्या माणसाच्या हातून उत्तम काम होऊं लागतं. तो इंद्रियवासनेच्या आहारीं जात नाहीं. निषिद्ध विषय आपोआप टळूं लागतात. शास्त्रं चांगलीं समजूं लागतात. संसाराकडची धांव कमी होते. मन स्वाधीन होऊं लागतं, वृत्ति उदार होते.’

‘ बरं दादा, आणि तुमच्या रजोगुणानं युद्ध जिंकलं तर काय होतं?’

‘ असं होतं कीं, नेहमीं कांहीं तरी कार्य करीत राहावं अशी इच्छा होऊं लागते. इंद्रिय विषयांचा बरेवाईटपणा तो फारसा पाहात नाहीं. त्यांची गोडी घेऊ घेऊंच म्हणतो. म्हणजे तुझ्या माहितीचं उदाहरण द्यायचं तर म्हणेन कीं, शेळी जशी वाटेल त्या झाडाला तोंड लावते त्या प्रमाणं रजोगुणी मनुष्य करीत सुटतो. त्याला अचाट कामं करावीशीं वाटूं लागतात. देवळं बांधूं लागला कीं देवळंच बांधीत सुटतो. तळीं विहिरी खोदूं लागतो. बागबगीचे करूं लागतो. सत्त्वगुणी मनुष्य हा ज्ञानी मनुष्य-वर्गांत जन्माला येतो, तसा रजोगुणी हा कामकऱ्यांच्या जन्माला येतो. मोठ्या लग्नाला जाणाऱ्या वऱ्हाडाबरोबरचा बैल पक्वान्नाकडं तोंड करीत नाहीं; लग्नांतहि त्याच्या कपाळीं कडबाच ! त्याप्रमाणं रजोगुणी मनुष्य एखाद्या शांततामय तपोवनांत गेला तरी तिथं काय नवा उद्योग हुडकून काढायचा या विचारानं हिंडे फिरेल.’

‘ बरं, हें सगळं झालं दादा. देवानं माणूस उत्पन्न केला अन तो तीन गुणांचा तीन स्वभावांचा केला. बरं मग त्याची पुढं वाट ?’

‘ वाट काय ? उपजलेलं प्राण्याचं मूल काय करतं सांग बरं.’

‘ हां सांगतों. आधीं प्रथम आईच्या थानाला तोंड लावून दूध पिऊं लागतं चुरुचुरु. रडतं, आवाज काढूं लागतं कुरु कुरु. डोळे उघडले। तर उघडून उजेडांत इकडं तिकडं पाहूं लागतं. आणि सगळ्यांत मोठं हें कीं तोंड उघडून वारा आंत ओढून घ्यायचा, बाहेर सोडून द्यायचा, हें भाते-फुक्याचं काम करूं लागतं.’

‘ ठीक. पण तें फुकट नाहीं करीत. हें काम करतं म्हणून त्याच्या पोटालाहि मिळतं. त्याची तजवीज देवानं करून ठेवलेलीच असते. मनुष्य-मात्रानं काम यथाशक्ति केलं पाहिजे, आणि त्याच्या पोटाला मिळालं पाहिजे, हा जो आपला हल्लींचा समाज राजकारणाचा मोठा प्रश्न तो पहा ईश्वरानं कसा आधींच सोडवून ठेवला आहे तो ’

‘ पण, दादा, लहान मूल श्वास घेतं सोडतं हें काम का काय ? अन् तें केलं तरी तें आपणाकरितां करतं ! त्याकरितां त्याला मजुरी. ? ’

‘ कां बरं ? देवानं जन्माला घातलेल्या प्राण्यानं जगण्याकरतां श्वासोच्छ्वास करणं, हें काम तो प्राणी एका अर्थानं देवाचं करतो आणि तें तो देवाकरतां करतो असं कां म्हणूं नये ? ’

‘ तें कसं ? ’

‘ तें असं कीं, माणूस देवाला म्हणायला का गेला होता मला जन्माला घाल म्हणून ? त्यानं प्रकृतीकडून प्राण्याच्या जन्माचा खेळ केला स्वतःला हवा म्हणून. आणि प्राणिमात्र जगून आपलं चरित्र करून दाखवितात हा त्या खेळांतला एक भाग असतो. मालक खेळ लावील त्यांत प्राण्याला आपलं पात्राचं नेमून दिलेलं काम केलं पाहिजे यथागुण यथाशक्ति. आणि नाटकाच्या मालकालाहि घालावंच लागतं पोटाला, आपल्या या नाटक मंडळींतल्या पात्रांना. जगणं हें देवाचं पहिलं काम प्राणी करतो. आणि खेळांतलं पात्र म्हणून नाटक करून दाखविणं हें त्यापुढचं दुसरं काम.’

‘ बरं. जगण्याच्या पहिल्या कामाकरितां मजुरी म्हणून देवानं आईच्या अंगावरच्या दुधापासनं सोय केली आहे हें कळलं. पण पुढं तें दूध तुटलं म्हणजे ? ’

‘ अंगावरचं दूध तुटायच्या सुमाराला मूल चालतं बोलतं होतं. यामुळं त्याला रडून ओरडून भूक लागली म्हणून सांगतां येतं. पण आईबाप म्हणजे त्याच्याकरतां ईश्वरानं नेमलेले नोकर ! ते त्याच्या ओरडण्यापर्यंतहि वाट पहात नाहींत. ते बहुधा आधींच त्याची तजवीज करितात.

शिवाय चालत्या बोलत्या मुलाला आपल्या पराक्रमानं ( म्हणजे उचलून हिसकून चोरून ) मिळेल तें घेऊन खातां येतं. आणि पुढं मूल पुष्कळच मोठं झालं म्हणजे त्याला आईबापांचीहि गरज लागत नाहीं. लहान वयाचीं मुलंहि शेतींत कारखान्यांत कामं करितात हें पाहतोस ना ? तूं त्या सुभान्या पोराला शेतकामाबद्दल गुरं राखल्याबद्दल पगार देतोस, तो पोर किती थोड्या वयाचा आहे ? आणि याच्यापुढं तर सगळं जग देवानं माणसाला दिलं आहे. भिकाऱ्याचीं पोरं काम करून उद्याला आलीं लाखोपति झालीं हें तूं पाहिलंच असशील, मुंबईस होतास तेव्हां ? '

' मग काय माणसानं या जगाचं हवं तसं करावं ? बुद्धीला येईल तसं ? '

' यांत काय संशय ? हातांतल्या मेणाच्या गोळयांतनं हवं तें चित्र काढावं ! तसंच जगांतन. आणि तसं तो आज लाखों वर्षें करीतहि आला आहे. त्यांत त्यानं कधीं ईश्वराला सल्ला किंवा परवानगी विचारली नाहीं. आणि त्यानं विचारली तरी ईश्वरानं दिली असा पुरावा नाहीं.'

' आणि मग दादा, प्रार्थना करतात, कौल लावतात, स्वप्नं पडावीं म्हणून पाडून घेतात—म्हणजे अशा रीतीनं ईश्वराचा सल्ला परवानगी घेण्याचा प्रयत्न लोक करतात तें काय ? '

' तें काय तें खरं सांगूं मी तुला गेनबा ? मात्र हंसूं नको. तूं एखाद्या सिनेमांत कुणी टेलिफोनवर दुसऱ्याशीं बोलतं असं पाहिलं आहेस का ? तें पाहून तुला काय वाटलं ? '

' तें टेलिफोनवर बोलण्याचं नुसतं नाटक, दादा. घंटा वाजती ती खोटीच. म्हणजे इकडची जागच्या जागचीच वाजती. बोलणारा हातानं चक्कर फिरवून म्हणे तिकडचा नंबर घेतो ! खोटं. मग टेलिफोनचं दुतोंडं शिंग हातांत घेतो. एका कानाला लावून त्यांतन तिकडचं बोलणं ऐकूं आल्यासारखं दाखवितो. पण तें ऐकूं येणं साफ खोटं. येऊन जाऊन खरं काय ? तर बोलायच्या कप्प्यांत तोंड घालून स्वतः शब्द बोलतो एवढं खरं. आणि तेच शब्द सिनेमा पाहणाराला ऐकूं येतात.'

'अन् तो बोलणारा हॅलो करतो. तिकडच्या बोलणाराचा म्हणून प्रश्न विचारतो किंवा त्याचं उत्तर आलं तें आपण उच्चारून दाखवून फिरून त्याला प्रत्युत्तर देतो. हंसतो खिदळतो. ' हां हूं ' करतो. ' अस्सं अस्सं ' म्हणतो. हें सगळं खोटंच तर मग ? '

' यांत काय संशय दादा ! '

' तुला नाहीं म्हटलं तरी पुष्कळच कळतं गेनबा ! सिनेमांतल्या टेलिफोनचं तुझं वर्णन अगदीं खरं आहे. आणि असाच प्रकार आहे बघ ईश्वराच्या प्रार्थनांचा. कौल लावण्याचा. स्वप्नांतले दृष्टांत घेण्याचा ! खरा प्रकार असा आहे कीं, ईश्वराकडचा टेलिफोन सदा बंदच असतो. एखादा कारखानदार मालक कंटाळला असला, त्याला आपण झोप घ्यावी कुणीं उठवूं नये असं वाटत असलं, म्हणजे तो पलंगाशेजारच्या टेलिफोनवरचं दुतोंडं दुकाटणं काढून ठेवतो. म्हणजे तिकडनं कुणीं शंख केला तरी इकडची घंटा वाजत नाहीं. झोप मोडत नाहीं. असला आहे ईश्वराचा हा टेलिफोन, एकतर्फी एकतोंडी. माणूस आपणाकडनं प्रार्थनेच्या रूपानं सल्ला विचारतो, परवानगी मागतो, ईश्वराची. पण त्याचं उत्तर येत नाहीं. आणि माणूस घेऊन चालतो कीं, आपली प्रार्थना ईश्वराजवळ रुजू झाली अन् ती सफळ होणार ! कौल लावून उत्तर घेण्याचा प्रकार पाहतोसच. पण ओलीं फुलं, तांदूळ, मूर्तीच्या अंगावर चिकटवावयाचे त्यांतला कोणता तरी एक आधीं पडायचाच ! आणि म्हणायचं तें उत्तर देवानं दिलं. पण तुझ्या कोकणचीच गोष्ट सांगतात ती माहीत आहे ना ? झाडाच्या देवाला कौल लावायची ? ' देवा ! झाड बुंध्यापासनं तोडूं की मूठभर ठेवून तोडूं ? ' देवाला घातलेल्या या कोलदांड्यांत ' तोड ' हें उत्तर ठरलेलंच. आहे कीं नाहीं, सांग ! देवाच्या मनांत ' तोडूंच नको ' असं उत्तर द्यायचं आलं समज, पण तो देव तें कसं प्रगट करणार ? तात्पर्य बोलणं कशावरनं निघालं ? मी म्हणत होतों मनुष्याला देवानं तीन गुण, मन, बुद्धि व अहंकार इतकी सामुग्री देऊन जन्माला घातलं, आणि हें सगळं जग त्याच्या स्वाधीन केलं, त्याचं हवं तें करायला.

त्याप्रमाणं तो सुचेल तें करतो आहे झालं. यांत ईश्वराची परवानगी सल्लामसलत वेळोवेळीं कांहींएक घेतली जात नाहीं. ती घेतल्याचा बहाणा जे करतात ते भोळे असतात नाहीं तर भोंदु तरी असतात.'

## संवाद ११ वा.

' बरं दादा, देव आपल्या आपण झाला, त्यानं हें जग केलं. आणि त्यांत हा माणूस केला बरावाईट, तीन गुणांचा, स्वभावांचा. हें झालं, ऐकलं, पण एवढं सांगूनच का गीता थांबली? त्या माणसानं पुढं काय कसं वागावं याचं कांहीं गीतेंत नाहीं सांगितलं, दादा ?'

' भलतंच ! त्या माणसानं पुढं काय करावं काय न करावं हेंच तर मुख्य गीतेंत सांगितलं आहे. म्हणूनच गीतेला नीतीचं शास्त्र म्हणतात. आतां त्याबरोबर अर्थात् हेंहि सांगितलं आहे कीं, माणसानं जगांत काय करायचं तें करावं, पण शेवटीं ईश्वराला ओळखून त्याला आपलासा करून मोक्ष म्हणतात तो मिळवावा. कारण माणसानं जगांत काय करायचं तें कितीहि करून झालं तरी, शेवटीं त्याला मरायचंच आहे ना! आणि माणूस आला कुठून याचा जसा विचार आपल्याला सुचतो, वेडं करून सोडतो तसाच तो मेल्यावर कुठें जाणार हाहि विचार सुचतोच कीं नाहीं ? म्हणून गीतेंत दिसतांना भर दिलेला दिसतो या दुसऱ्यावर. पण खरं पाहिलं तर माणसानं जिवंतपणीं काय करावं, कसं करावं, हेंच खरोखर गीतेंत पुष्कळसं सांगितलं आहे. आतां माणूस पाहील त्या दृष्टीनं त्याला गीता दिसते. म्हणून कांहीं लोक पहिल्या गोष्टीवर–म्हणजे जितेपणीं काय करावं या गोष्टीवर–जास्ती भर देतात. कांहीं लोक दुसऱ्यावर– म्हणजे मेल्यावर कुठं जावं–काय मिळवावं यावर जास्ती भर

देतात. आणि तिसरे असे लोक आहेत कीं, या दोन्ही दृष्टींचा उत्तम मेळ घालतात.'

'मग दादा, तुम्ही या तिघांतले कोण ?'

'मी यांतला तिसरा आहे म्हण. म्हणजे मला जरी माणसानं जन्मांत काय करावं कसं करावं याचं गीतेचं शिकवणं अधिक मोलाचं व महत्त्वाचं वाटतं तरी, त्या दुसऱ्या गोष्टीचा अगदींच विचार करूं नये असं मात्र मला वाटत नाहीं. म्हणून मी तुला या दुसऱ्या गोष्टीचंच प्रथम थोडं सांगतों, आणि मग माणसानं काय करावं, कसं करावं याचं गीता काय म्हणते तें सांगेन अधिक विस्तारानं.'

'बरं तर ! तुम्हांला हवं तसं आगंमागं सांगा. मला तें सारं नवंच आहे.'

'ठीक आहे. तें दुसरं सांगायचं तर असं कीं, जन्मभर माणसानं आपल्या बुद्धीला येईल तसं सारं केलं तरी, मेल्यावर त्यानं मोक्ष म्हणून म्हणतात, किंवा सद्गति उत्तम गति म्हणतात ती मिळण्याची आशा धरावी. पण हा मोक्ष—ही गति—कशी मिळवायची किंवा तो मोक्ष म्हणजे तरी काय, याविषयीं सगळ्यांचं मत एक नाहीं. एक म्हणतात माणूस ईश्वरापासून निघाला, आणि शेवटीं ईश्वरांतच जाऊन मिळायचा, तर त्यानं जन्मांत दुसरं तिसरं कांहीं करूं नये. साधेल त्याप्रमाणं ईश्वराचं चिंतन करावं. आपल्या जुन्या घरची ओळख ठेवावी. आपण आणि ईश्वर, आणि तसंच हें सारं जग आणि ईश्वर, हीं एकच आहेत हें समजून घ्यावें. त्यावर तसा विश्वास ठेवावा. म्हणजे मग त्यानं जगांत इतर कांहीं न केलं तरी चालेल. आणि हें इतर कांहीं करायचं नाहीं. म्हणजे, तुम्ही आम्ही समजतों त्याप्रमाणं, या जगासारखीं पण त्याहून आणखी चांगलीं अशीं दुसरीं कांहीं जगं आहेत तीं मिळण्याचाहि प्रयत्न करायचा नाहीं.'

'आणि दादा, दुसरीं जगं ? आणि अधिक चांगलीं जगं ? तीं कोणतीं ?'

‘ तीं जगं म्हणजे उदाहरणार्थ, आपले वाडवडील आपल्या आधीं मेले ते जिथं जाऊन राहिले तें एक जग. त्याला पितरांचं जग म्हणतात.’

‘आणि या पितरांच्या जगांत आपण गेलों म्हणजे आपणहि पितर होऊं, आणि ते जें सुख मिळवितात तें आपणहि मिळवूं असंच ना ? ’

‘ होय. तशी समजूत आहे खरी. पितरांना आवडतील अशीं धर्मकृत्यं आपण इथं केलीं म्हणजे आपण पितर लोकाला जातों अशी समजूत. पण त्याच्याहून आणखी एक चांगलं जग आहे म्हणे ! त्याला स्वर्गलोक म्हणतात. आणि तुला हें माहीत आहेच कीं, सामान्य माणसं देवाघरीं देवाला जाऊन मिळूं अशी इच्छा करण्यापेक्षांहि या स्वर्गलोकाला जाऊं अशी इच्छा अधिक करितात. आणि याकरितां स्वर्गांतल्या देवांना जीं धर्मकृत्यं आवडतात तींच या जगांत ते करितात. पितर लोकांत जाण्याकरितां श्राद्धपक्ष हे करायचे, आणि स्वर्गांत जाण्याकरितां व्रतंवैकल्यं यज्ञ हे करावयाचे. कारण आपल्या वेदांनीं असं शिकवून ठेविलं आहे कीं, स्वर्गांतल्या देवांना यज्ञ फार आवडतात. अलीकडे यज्ञ मागं पडले आहेत म्हणा. पण पूर्वीं वेदांच्या वेळीं यज्ञांनाच फार महत्त्व होतं हें कदाचित् तूंहि ऐकलं असशील ? पण अलीकडं यज्ञ करणं कठीण झालं आहे म्हणून मग धार्मिक व्रत वगैरे करितात आणि स्वर्गाला जाण्याची इच्छा धरितात. यानंतर यज्ञ आणि व्रतं यांच्यापेक्षांहि देवाची भक्ति करायचा मार्ग लोकांना आवडूं लागला. कारण तो सोपा असा त्यांना वाटतो. पण त्यांनीं सुद्धां वैकुंठ नांवाचा स्वर्गलोक हाच आपला मुक्काम ठरविला आहे. आणि या स्वर्गांत स्वतः ईश्वर येऊन राहतो नांदतो अशी त्यांची समजूत असते ! पण गीता या सर्वांपलीकडे गेली आहे. आणि तिचं सांगणं असं कीं, पितरलोक स्वर्गलोक आणि स्वर्गांत येऊन राहणारा ईश्वर यांच्यापेक्षां, मूळचा आपल्याच जागीं कायम राहणारा, पण मनुष्याच्या अंगांतहि राहणारा जो ईश्वर त्याचीच प्राप्ति एकदम करून घ्यावी. कोणचाहि धर्म घेतला तरी मरणानंतर माणसाचा

आत्मा जिथं जातो, जाऊं शकतो, असे अनेक लोक त्या धर्मांत सांगितले आहेत. म्हणजे जाऊन पोचण्याचीं, थोडा वेळ किंवा कायमचा मुक्काम करण्याचीं, तीं ठिकाणं आहेत. आणि समजूत अशी कीं, या आपल्या जगांत माणूस जें पाप-पुण्य, चांगलं वाईट, जसं जितकं करतो, त्याप्रमाणं त्याला पुढं तिकडं चांगलं किंवा वाईट ठिकाण मिळतं. त्या ठिकाणांत मुख्य दोन. एक सैतानाचा गांव आणि दुसरा जागत्या ( जिवंत म्हणायचं नाहीं बरं का चुकूनहि ) नांदत्या देवाचा गांव. ख्रिस्ती लोक मानतात कीं, प्रलयकालीं एकदां सर्व आत्म्यांना देवापुढं बोलावणं येतं. तिथं त्यांच्या पापपुण्याची झडती चौकशी होते. दुराचरणी पापी लोकांना नरकांत आणि पुण्यवंतांना स्वर्गांत पाठविण्यांत येतं. आणि ही व्यवस्था कायमची ! तींत बदल व्हायचा नाहीं. म्हणजे ख्रिस्ती आत्म्याचं चरित्र हें एक अंकी संपूर्ण नाटक आहे. कारण जन्म संसार आणि मरणोत्तर स्थिति हे तीनहि प्रवेश सलग एकाच अंकांत दाखवून झाले म्हणजे खेळ खलास ! आम्हां हिंदूंचं नाटक एकांकी नाहो. त्याचे अंक किती व्हावे हें ज्याच्या त्याच्या हातीं आहे.'

'तें कसं दादा ?'

'तें असं कीं, ईश्वरानं निरनिराळे लोक उत्पन्न करून ठेवले आहेत. मग जो मनुष्य ज्या लोकाची ( मुक्कामाची ) इच्छा धरतो, त्या लोकाला जाण्याला जीं धर्मकृत्यं सांगितलीं आहेत तीं करणाराला तो लोक मिळतो. आणि त्या लोकांतलं सुख भोगायला त्याला मिळतं. पण हें कुठपर्यंत ? तर त्याच्या गांठीचं पुण्य संपून जाईपर्यंत. तें संपलं कीं त्या मनुष्याला पुन्हां या पृथ्वीवर येऊन जन्म काढावा लागतो. आणि मग पुन्हां तो जसं पुण्य जोडील तसा त्याला पुन्हां तो तो लोक मिळतो.'

'अन् गांठीचं पुण्य संपतं दादा ? आणि तें कसं हो ?'

'मी सांगतों कसं तें. हें पहा, तुझ्या विहिरीवरचा हा माळेचा रहाट चालू आहे ना ? बघ विहिरींत डोकावून. त्या रहाटाची एका अंगचीं मडकीं पाणी भरून घेऊन वर येताहेत. आणि त्या अंगचं शेवटचं

मडकं पाण्यांत बुडून पाणी भरून घेत आहे. या सर्वांचीं तोंडं वर आहेत. उलट माळेच्या दुसऱ्या अंगचीं मडकीं खालीं तोंड करून पाण्याकडं रिकामीं रिकामीं जाताहेत. मग काय होईल? तूं पायानं रहाटाचे दांडे हलवूं लागलास म्हणजे एकामागून एक भरलेल्या लोट्यांतल पाणी पन्हाळांत सांडून ते रिकामे होऊन खालीं जाऊं लागतील कीं नाहीं? तसंच हें जन्माच चक्र आहे बघ. इतर धर्मांत पुनर्जन्म नाहीं म्हणून त्यांच्यांतलं नाटक एकांकी, हिंदु धर्मांत पुनर्जन्म मानतात म्हणून जिवाचं नाटक अनेकांकी. आणि त्यांत या फिरत्या राहाटावर बांधलेले लोटे पाण्यानं भरून वर चढतात, आणि पाणी ओतून रिकामे झाले म्हणजे पुन्हा विहिरीच्या पाण्याकडे खालीं येऊं लागतात. त्यांना कायमची विश्रांति नाहीं. आतां निरनिराळे लोक कोणचे ते सांगतों ऐक. पृथ्वीच्या बुडाशीं तळाशीं नरक, यमलोक, पाताळलोक, नागलोक इत्यादि. यांत जाऊन पडण्याची कुणाचीच इच्छा नसते हें उघड आहे. त्यांत जाऊन पडणारा हा शिक्षा भोगण्याकरितां म्हणून सक्तीनं पाठविला जातो. याच्या उलट बाकीचे 'लोक' हे वर आकाशांत आहेत, कमजास्त उंचीवर. जिथं गेलेला मनुष्य परत येतच नाहीं तो ब्रह्मीभूत आत्म्यांचा (स्वतःच ब्रह्म पदवीला पोंचलेल्यांचा) लोक. त्याखालीं ब्रह्मलोक. त्याखालीं आकाशांत जे चकाकणारे तारे दिसतात ते ज्योतिर्लोक. त्याखालीं स्वर्गलोक. या स्वर्गलोकाचा राजा इंद्र. आणि तिथं हिंडायला नंदनवन, प्यायला अमृत, करमणुकीला अप्सरा, गाणं ऐकायचं तर गंधर्व, इतर करमणुकीला संचाराला यक्ष किन्नर यांचे जवळच असणारे प्रांत. आणि पितरलोक हा कुणी म्हणतात दक्षिणेला यमनगरीजवळ, कुणी म्हणतात वर, पण या स्वर्गादि लोकांच्या खालीं असतो.'

'मग या पितरांच्या लोकांत गेलं तर आपल्या सगळया पूर्वजांची गांठ पडेल नाहीं?'

'हो. पडेल कीं. पण तिथं समाईक कुटुंबपद्धति नाहीं. ज्यानं त्यानं आपल्या पदरांत आपली शिधोरी बांधून आणावी लागते. हल्लींच्या

शिधापद्धतींतल्या पाहुण्यासारखी ! आतां इतर निरनिराळे 'लोक' म्हणजे निरनिराळीं गांवं झालीं. म्हणजे त्यांना जायला वाटाहि निरनिराळ्या असायच्याच. आणि या वाटा म्हणजे निरनिराळीं धार्मिक पवित्र समजलीं जाणारीं कृत्यं. तीं तीं केलीं म्हणजे ते ते 'लोक' मिळतात, गांव भेटतात. पण स्वर्ग काय, नरक काय, तिथं जातात त्या दोन्ही आडवाटा आहेत. त्यांत चोर भेटतात. स्वर्गाला जाणारा मनुष्य कर्म करतो तें बाहेरून पुण्य केल्यासारखं दिसतं. पण आंतून खरं तर तें एक प्रकारचं पापच असतं. आणि नरकाला नेणारं कर्म तर आंतून बाहेरून धडधडीत पापच असतं.

'स्वर्गलोक कसा आहे याचं ज्ञानेश्वरीनं केलेलं वर्णनच तुला वाचून दाखवितो ऐक.

( स्वर्गात ) अमररत्व हेंचि सिंहासन । ऐरावतासारिखें वाहन । राजधानी भुवन । अमरावती ॥ जेथ महासिद्धीचीं भांडारें । अमृताचीं कोठारें । जिये गावीं खिल्लारें । कामधेनूंचीं ॥ जेथ वोळगे देव पाइका । सैंध चिंतामणीचिया भूमिका । विनोद वन वाटिका । सुरतरूचिया ॥ गंधर्व गात गाणीं । जेथ रंभे ऐशिया नाचणी । उर्वशी मुख्य विलासिनी । अंतौरिया ॥ मदन वोळगे शेजारे । जेथ चंद्र शिंपे सांबरें । पवना ऐसे म्हणियारें । धावणे जेथ ॥ पैं बृहस्पति मुख्य आपण । ऐसे स्वस्तिश्रियेचे ब्राह्मण । ताटियेचे सुरगण । बहुवस जेथें ॥ लोकपाळ रांगेचे । राउत जिये पदवीचे । उच्चैश्रवारवांचे । खोलणिये ॥ हे असो बहु ऐसे । भोग इंद्रसुखा सरिसे । ते भोगिजति जंव असे । पुण्यलेशु ॥ ( याचा अर्थ करून मीं गेनबाला सांगितला. )'

'दादा, काय हें स्वर्गलोकचं सुख ? आणि हें सारं नुसता यज्ञ करून मिळतं अं ?'

'समजलों तुझा अर्थ. तूं स्पष्ट बोलला नाहींस तरी तुझं म्हणणं असं कीं, तुपाचे बुदले ओतल्यानं, यज्ञपशु बोकड मारल्यानं, आणि वेदमंत्रांनीं आकाश कोंदल्यानं—म्हणजे इतक्या साध्या फुकट्या गोष्टींनीं हें स्वर्गसुख मिळत असेल, तर संसारी लोक तो मार्ग टाकून कोरड्या अध्यात्म-

ज्ञानाकडं कशाला वळतील ? होय खरंच आहे. पण गीतेनं या यज्ञ-मार्गाला व या स्वर्गसुखाला महत्त्व दिलं आहे अशी तुझी समज़ूत असेल तर ती काढून काढ. कारण गीतेनं वेद, त्यांचा यज्ञमार्ग व स्वर्गसुख, या दोहोंचीहि निंदाच केली आहे. 'गीतेला आधार वेदांचा. वेदामध्यें तर यज्ञांची स्तुति. आणि गीतेंत यज्ञांची निंदा'! मग हें कसं झालं ? असं तुला वाटेल. पण त्याचं कारण असं कीं, जुन्या सनातन्याला समाज आदर-बुद्धीनं वागवितो तरी, तो आपल्या बुद्धिनुसार आपल्या नीतितत्त्वांची, धर्मतत्त्वांची, उन्नति व सुधारणा करीतच असतो. तुला खरं वाटण्याकरितां यज्ञमार्गाविषयीं गीता काय म्हणते हें ज्ञानेश्वरांच्या शब्दांनींच तुला सांगतों म्हणजे लक्षांत येईल.

अथवा यज्ञदानादि किरीटी । कां तपेहन जे हुटहुटी ।
ते तृणा एकासाठीं । न सरे एथ ॥

तसेंच—

वेदाधारें बोलती । केवळ कर्म प्रतिष्ठिति । परि कर्मफळीं आसक्ति । धरूनियां ॥ म्हणती संसारीं जन्मिजे । यज्ञादिक कर्म कीजे । मग स्वर्ग-सुख भोगिजे । मनोहर ॥ देखें कामना अभिभूत । होऊनि कर्मे आचरत । ते केवळ भोगीं चित्त । देऊनियां ॥ क्रियाविशेषें बहुतें । न लोपती विधीतें । निपुण होउनी धर्मातें । अनुष्ठिती ॥ परि एकचि कुडें करिती । जे स्वर्ग-कामू मनीं धरिती । यज्ञ पुरुषा चुकती । भोक्ता जो ॥

तात्पर्य, स्वर्गलोक मिळविण्याची इच्छा ही देखील गीतेनं गौण मानली. मग भूतलोक पितृलोक इत्यादि हलक्या दर्जाचे लोक गीता तुच्छ मानील यांत काय आश्चर्य ? याचं कारण असं कीं, मनुष्याचा आत्मा या लोकांत जाऊन खरा मोक्ष मिळवीत नाहींच पण या लोकां-तील सुखहि फार काळ भोगायला तिथं टिकत नाहीं. कारण त्याच्या पुण्याच्या सांठ्याला गळती लागलेली असून, तें संपतांच पृथ्वीवर नवा देह घेऊन संसारांत पडावं लागतं. मग अशी ये जा करण्याची यात्रा काय कामाची ? गीतेच्या मतें ईश्वरस्वरूप ओळखणं, म्हणजे ब्रह्म व आत्मा

हीं एकच आहेत असं ज्ञान होणं; आणि तें ज्ञान अंगीं बाणण्याच्या खुणा अंगीं प्रगट होणं यांतच खरी शाश्वत स्थिति व शाश्वत सुख आहे.'

'बरं दादा, पितरलोक मिळायला श्राद्धपक्ष झाले. स्वर्गलोक मिळायला यज्ञव्रतं झालीं. स्वर्गात वैकुंठांत राहणारा देव भेटायला भक्ति झाली.' पण या कोणच्याहि लोकांत न भेटणारा, मूळचा अस्सल आपल्याच ठिकाणीं असणारा, ईश्वर भेटायचं साधन कोणचं ?'

'गीतेच्या म्हणण्याप्रमाणं तें साधन हेंच कीं, ईश्वर आणि आपण एक आहों, ईश्वर आणि जग हीं एकच आहेत, वेगळीं नाहींत, आणि जें जग म्हणून दिसतं त्या सर्वांत ईश्वर भरला आहे याचं ज्ञान करून घेणं.'

'पण मग दादा, यासारखं सोपं कांहींच नाहीं कीं ! मी हा असा अज्ञानी न शिकलेला माणूस ! मला देखील हें पटतं कीं ! ईश्वर आणि त्या जगांतला मी हीं सारीं एकच आहेत. मग मला हें ज्ञान झालं का ? आणि मला ईश्वर मिळणार का ?'

'बरा भोळा दिसतोस रे तूं गेनू ! इतक्या सोप्या रीतीनं ईश्वर मिळाला तर आणखी काय पाहिजे ? पण जी गोम आहे ती यांतच आहे. कारण हें जें ज्ञान म्हटलंस तें कुणाला खरं झालं कशावरून, याची कांहीं परीक्षा ठेविली आहे गीतेंतल्या शास्त्रानं. आणि तींत यशस्वी होणारा माणूस क्वचितच भेटायचा. गीतेनं अशी सांगड घातली आहे कीं, हें जें ज्ञान तें अमक्याला झालं अशा ओळखण्याच्या कांहीं खुणा आहेत. आणि त्या त्याच्या आचरणांत दिसून आल्या पाहिजेत. उलट या खुणा ज्याच्या आंगावर आणि आचरणांत दिसत नाहींत त्याला तें ज्ञान झालं नाही असं खुशाल समजावं.'

'त्या खुणा कसल्या बुवा ? जटा वाढवाव्या, दाढी ठेवावी, आंगाला भस्म लावावं, उपासतापास करावे, आंगावर भगवीं नाहीं तर तसल्याच कांहीं रंगांचीं वस्त्रं घालावीं—एकूण काय ? जुन्या काळचे ऋषी आणि आजच्या काळांतले बुवा, साधू, फकीर, संन्यासी एवढेच

लोक धार्मिक आचरण करणारे असे मला दिसतात. फार तर यांत ब्रह्मचाऱ्यांची भर घाला. येऊन जाऊन याच खुणा आंगावरच्या आणि आचरणांतल्या असणार. आणि अशा लोकांना ईश्वर आणि जग हीं एकच आहेत असं ज्ञान झालं माझ्या सारखं म्हणजे संपलंना! एकी एकी एक. दोन अन् दोन चार! पण हें ज्ञान झालं कसलं? तें असणारच. मी हा संसार अन् शेतीचा उद्योग करणारा माणूस. तें ज्ञान मला झालं असं मी म्हणतों, म्हणजे ईश्वर आणि जग एक आहेत असं कबूल करतों—नव्हे मानतों—सुद्धां—तर मग माझ्याप्रमाणं संसार न करणारे हे बुवा, ब्रह्मचारी, साधु, गोसावी यांना तें ज्ञान सहजच असणार. त्यांना का माझ्यापेक्षां बुद्धि कमी? का धर्माची आवड कमी? का ईश्वर भेटण्याची आवड कमी?'

'तुझा हा युक्तिवाद वरवर दिसायला ठीक आहे. पण ज्ञानी माणसांच्या, म्हणजे जीव ब्रह्म सृष्टि परमात्मा सगळीं एकच अशी कल्पना ज्यांना (केवळ नुसत्या तर्कानें करतां आली असं नव्हे तर) खरोखर अंतर्यामीं बिंबली, त्यांच्या खुणा कांहीं वेगळ्याच आहेत. आणि त्या गीतेंत काय सांगितल्या आहेत याचा पाढा मीं तुझ्या पुढं वाचला म्हणजे मग सांभाळ. डोळे पांढरे करशील! चार हात मागं फिरून म्हणशील कीं, हाच जर तुमचा खरा ज्ञानी असेल तर मीचसा काय पण दुसरा कुणींहि क्वचितच आढळेल.'

'ठीक आहे तर दादा. सांगा त्या खुणा. ऐकूं या.'

'ज्ञानी म्हणजे आत्मा व ईश्वर एक आहेत असें ज्याला खरोखर कळलं' आणि ज्याच्या मनांत संसाराविषयीं वैराग्य व उदासीनता उत्पन्न झाली असा मनुष्य. या ज्ञानामुळं तो आत्मसुखांत निमग्न असतो. दुःखानं त्याचं मन उद्विग्न होत नाहीं. सुख मिळविण्याच्या दगदगींत तो पडत नाहीं. त्याला काम क्रोध उरत नाहीं. भयहि कशाचं वाटत नाहीं. चंद्राप्रमाणं तो सर्वांना आपल्या समबुद्धीचं तेज सारखं देतो. हा जवळ तो दूर असं मानीत नाहीं. हा प्रिय तो अप्रिय असं मानीत नाहीं. सर्व प्राणिमात्रांविषयीं त्याच्या मनांत सारखीच दयाबुद्धि व प्रेम असतं. लाभामुळं

त्याला सुख वाटत नाहीं. हानीमुळं दुःख वाटत नाहीं. तो खिन्न होत नाहीं. त्याचीं इंद्रियं त्याच्या ताब्यांत राहतात. कासव नाहीं का आपले पाय व डोकं हवं तेव्हां आंत घेतं व हवं तेव्हां बाहेर काढितं? तसं! एकादं झाड विषारी असतं तें नको म्हणून त्याचीं पानं तेवढीं वर वर खुडलीं, पण त्याच्या मुळांना पाणी मिळूं दिलं तर तें झाड मरेल काय? नाहीं. त्याप्रमाणं मनांत विषयांची, म्हणजे सुखाची आवड सुखाची इच्छा जिवंत राहिली, आणि बाहेर इंद्रियाना मात्र आळा घालण्याचं मनांत आणलं तर तें साधेल काय? मीच ब्रह्म आहें असं ज्याला वाटतं त्याला बाहेरून कोणत्याहि पदार्थाची गोडी घ्यावी असं वाटेनासंच होतं. म्हणून इंद्रियांना आपल्या संवई सोडाव्या लागतात. योगी लोक ऋद्धि सिद्धि वश करून घेतात हा त्यांचा पराक्रमसा वाटतो. पण हडळ कृत्या वश झाली तर ती त्या योग्याच्याच उरावर बसायची! बरं, बंडखोर इंद्रियं नियंत्रणांत घातलीं तरी आंतून त्रास देत राहतातच. म्हणून सुखाची इच्छा ही मूळ मनांतच मारून टाकली पाहिजे. विषाचा एक थेंब देखील मारक होतो. एका ठिणगीनंहि मोठी आग लागते. त्याप्रमाणं सुखोपभोगांची थोडीशीहि इच्छा असली तर ती बाधक होते हें तो ज्ञानी जाणतो. सूर्याचा किरण वस्तूवर पडला असतां त्या किरणाचा प्रकाश त्या वस्तूवर पडतो. पण वस्तूचा रंग किंवा गुण किरणाला लागत नाहीं. त्याप्रमाणं मनांतली सुखाची इच्छा नाहींशी झाली म्हणजे सुखकारक पदार्थाचा स्पर्श झाला तरी तो बाधत नाहीं. आपण आणि हे सुखाचे विषय एकच आहोंत' अशी भावना झाल्यावर त्या विषयापासून आत्म्याला वेगळं सुख तें काय होणार? अग्नींत अग्नि पोळेल काय? बर्फाच्या खड्याला दुसरा बर्फाचा खडा लागला तरी काय होणार? स्वतः अंतःकरण आपल्याच सुखांत आनंदांत गर्क असलं म्हणजे मग त्याला बाहेरच्या सुखाची आनंदाची गरजच उरत नाहीं. ही गरज वाटली तरच मन चंचल होईल. आत्मप्राप्ति झालेल्या माणसानं सावधगिरी ठेवावी लागते. एखादी नाव नदीच्या कांठाला टेकून बांधून ठेवली आहे म्हणून सुरक्षित अशी वाटते खरी. पण वादळ झालं तर नावेचा

दोर तुटून ती वाहत जाण्याचा संभव असतो ना ! सुखाच्या इच्छेचं वादळ भडकण्याचाहि एखाद वेळ संभव असतो. म्हणून विशेष सावधपणा ठेवावा लागतो. ज्ञानी मनुष्य हा महा समुद्रासारखा गंभीर व प्रायः शांत असतो. शिवाय सगळ्या डोंगरावरचं पाणी आणून सोडलं तरी तो फुगत नाहीं किंवा मर्यादा सोडीत नाहीं. त्याप्रमाणं सुखसाधनं मिळालीं तरी त्याचं मन स्थिर राहतं. ज्याला इंद्रभुवनच मिळालं त्याला एखादा सुंदर तंबू राहुटी किंवा झोपडी दिसली तर ती आपणाला हवी अशी इच्छा होणारच नाहीं. अमृताचा पेला ओठाला लागल्यावर कांजी पेज दिसली, व सहज मिळण्यासारखी असली, तरी ती घ्यावी अशी इच्छा कुणाला होईल ?'

'काय सुंदर वर्णन केलंत दादा ? पण मी आणि परमेश्वर एकच आहों असं मला जरी समजतं तरी मी कांहीं, तुम्हीं आतां सांगितलेल्या साधुमाणसाप्रमाणं, बनलों नाहीं हें कसं ? शिवाय दुसरं असं कीं, मी जर असा साधु होऊन सर्व कांहीं मिळविलं तर मग मला जिवंत राहायचं आणि संसार करायचं तरी काय कारण हो, दादा ?'

'मला ठाऊकच कीं, तूं असला प्रश्न विचारणार म्हणून. आणि तुझ्यासारखा हा प्रश्न कुणालाहि सुचायचाच. अर्जुनानं देखील असाच प्रश्न कृष्णाला विचारून प्रथम अडविलं. पण त्याचं उत्तर सोपं आहे. 'ईश्वर आणि मी एकच आहें असं कळल्यावर मग मी जगावं तरी कशाला' असं तूं म्हणतोस. पण मी विचारतों, ईश्वरानं जर तुला उत्पन्न केला तर तूं त्याचा झालास ना ! तुझ्याच स्वाधीन तुला केला त्यानं आपली ठेव म्हणून ! मग ती ठेव तुला सांभाळायला नको का ? ती फेकून देण्याचा आधिकार तुला कसा ? तुला खरं आत्मज्ञान झालं म्हणून तुला आपलं शरीर, आपला जीव, जड वाटण्याचं काय कारण ? तुला मरण येईपर्यंत तीं तुला वागविलींच पाहिजेत. तसं न करशील तर ईश्वराचा विश्वासघात होईल. ज्ञान झालं म्हणून हातचं काम सोडावं हें कसं ठरतं ? बरं, दोन्हीची सांगड घालतां येत नाहीं असंहि नाहीं. इच्छा आपल्या ताब्यांत राहिल्या तर त्यानं

बिघडलं कुठं ? असं पहा. समोर खाऊ दिसला तर अज्ञान लहान मूल त्याकरितां हात पसरतं व तो मागतं. त्याची त्याला मुळींच लाज वाटत नाहीं. पण प्रौढ मूल कांहीं खाऊ मागत नाहीं. उलट कोणी घे म्हटलं तरी नको म्हणण्याइतकी त्याला आत्मप्रतिष्ठा प्रौढी वाटते. पण या करितां त्या प्रौढ मुलाचं मूलपण गेलं म्हणायचं का ? ईश्वरानं मांडलेल्या नाटकप्रयोगांत तुझ्याकडं गंभीर वृत्तीची भूमिका दिली, व समज ती तुला साधली तर काय बिघडलं ? नाटकांत काम करायचं तर थिल्लर हलकट ग्राम्य असलंच काम हवं असं का कुणी म्हणेल ? ईश्वराचं यथार्थ ज्ञान झालं तर त्यानं संसाराचं कुठं बिघडलं ? तें ज्ञानहि भोगावं, संसारहि करावा ! '

## संवाद १२ वा

'काय सांगतां दादा ? तुम्हीं वर्णन केलं ते सगळे गुण माणसाच्या अंगांत उतरले तर त्याच्या हातनं संसारच व्हायचा नाहीं. एक तर सगळं टाकून साधू बैरागी संन्यासी व्हावं, नाहीं तर थाटांत ऐटींत संसारसुख तरी भोगावं. पाण्यांत उभं राहावं पण म्हणे अंग भिजवूं नये असं कसं होईल ? '

' तूं म्हणतोस तें बरोबर आहे. पण हे गुण सांगितले ते एकदम एका दिवसांत कुणा माणसाच्या अंगीं थोडेच उतरणार ? मीं त्यांचं वर्णन केलं तरी ते हळूहळू प्रयत्नानंच साध्य होणार ! '

' म्हणजे ते सारे गुण माझ्या अंगीं जोंपर्यंत उतरले नाहींत, तोंपर्यंत, ' मला ईश्वराचं ज्ञान झालं ' असं जें मी म्हणतों तें खोटंच तर ? '

'यांत काय संशय ? अरे दोन आणि दोन चार होतात हें ज्ञान तुला झालं आहे खरं. पण दोन आंब्यांत दोन आंबे अधिक मिळविले तर चार आंबे होतात या नुसत्या हिशेबाचं गणिती ज्ञान झाल्यानं, तुला चार आंबे खाल्ल्याचं प्रत्यक्ष सुख मिळेल काय ? ज्याच्या हातांत ते चार आंबेच पडले त्याचाच तो हिशेब खरा. तुझा हिशेब नुसत्या तोंडच्या 'आंब्यांचा !' खऱ्या आंब्यांचा नव्हेच मुळीं. असं पहा. तूं तोंडानं ईश्वर असा शब्द उच्चारलास म्हणजे झालं का तुला ईश्वराचं ज्ञान ? आणि 'मी' हा शब्द उच्चारलास म्हणजे झालं का तुला तुझ्या स्वतःच्या आत्म्याचं तरी ज्ञान ? '

'मग दादा, हें तोंडच्या हिशेबाचं अंगांत कसं उतरायचं ? '

'माणसानं संसार करीत करीत राहिल्यानं. समज, मी आणि ईश्वर एक असं म्हणून जर तूं जीव दिलास तर, ज्ञानी माणसाच्या ज्या खुणा म्हणून वर सांगितल्या त्या तुझ्या अंगावर प्रगट झाल्या किंवा तुझ्या आचरणांत आल्या याचा पुरावा कसा मिळणार ? आत्महत्येचं पातक, ईश्वराचा विश्वासघात केल्याचं पातक, तेवढं तुला लागणार ! याच्या उलट तूं जिवंत राहून संसार करून जर तूं हे गुण प्रगट करूं शकलास तर खरं ! नाहीं तर तुझं ज्ञान तें कसलं ? आतां एखादा असा असेल कीं, त्याला तुझ्यापेक्षां हें ज्ञान थोडं अधिक लवकर होईल म्हणून काय झालं ? पण त्यामुळं त्यानंहि संसार टाकून द्यावा असं होत नाहीं. त्याचा संसार अध्यात्माच्या नीतीच्या दृष्टीनं तुझ्यापेक्षां अधिक चांगला झाला येवढंच ठरेल. पण संसार चांगला करण्याचं साधलं हें का संसार टाकून देण्याचं कारण होऊं शकेल ? बरं संसार टाकून द्यावा असं तूं म्हटलंस तर तूं फ़ार तर ब्रह्मचारी राहशील ! पण तुझ्या साडेतीन हात देहाचं कोणतं कर्म तुला सुटेल ? टाळतां येईल ? तूं काय स्नान टाकणार ? जेवण टाकणार ? झोप टाकणार ? अंगाचं संरक्षण करण्याकरितां घ्यायचं तें वस्त्र टाकणार ? तुला साधु, बुवा, बैरागी, संन्यासी, महाराज, डोळ्याला दिसतात. आणि त्यांचीं फार तर लग्नं

झालेलीं नसतात. पण त्यांच्या चरित्रांत खोल शिरूं नये एवढंच खरं. जीभ विटाळूं नये म्हणून, आजकाल डोळ्यापुढं असणाऱ्या साधुबुवासंबंधीं मी बोलत नाहीं इतकंच. पण या लोकांना खरं ईश्वरज्ञान झालं आहे असं का तुला वाटतं ? किंवा तें ज्ञान मिळविण्याच्या खऱ्या मार्गावर ते आहेत असं तरी ? त्यांचे वेष व आचार यांची छाननी केली तर असं दिसून येईल कीं, ती केवळ एक टूम आहे. लोकांमध्यें लोकविलक्षणपणानं राहिल्यानं लोकांकडून मिळणारी प्रतिष्ठा फुकट मिळविण्याचा तो एक लोभी अप्रामाणिक प्रयत्न आहे. कांहींच्या अंगीं हा दोष नसला तरी त्यांच्या परंपरेच्या सांप्रदायाच्या अभिमानाची केवळ ती एक खूण असते. वर वैराग्य मिरवून आंतून सर्व सुखं भोगण्याचा तो एक नीच दुहेरी डाव आहे. तोंडानं गृहस्थाश्रमाची निंदा करण्याचा आव घालून प्रत्यक्षांत मात्र गृहस्थाश्रमावर ताण करणारे हे लोक ! अरे, नंगे राहून वैराग्याची परमसीमा गांठली असं भासवूं पाहणाऱ्या हिंदुस्थानी बैराग्यांचीं संस्थानं आहेत ! त्यांच्या दारीं हत्ती झुलतात ! ते हत्तीवरून गंगास्नानाचं पुण्य जोडण्याला जातात, आणि आधीं बुडी मारण्याचा हक्क तुझा कीं माझा यावर भांडून कलागती मारामाऱ्या खून करतात. आमचे शंकराचार्य हे धर्मगुरु ना ? अस्सल संन्यासी. प्रत्यक्ष संन्यासदीक्षा घेतलेले. पण त्यांच्या म्हणे गाद्या आणि हजारों रुपये उत्पन्नाचीं संस्थानं. घराला नांव मठ ! पण यांच्या संध्यापूजेला सोन्याचांदीचीं भांडीं लागतात! यांच्या देव्हाऱ्यांत दिगंबर शंकराच्या अंगावर हिरेमाणकांचे, पाचूंचे, रत्नांचे दागिने. आणि त्यांचं प्रदर्शन करून श्रीमंती मिरविण्याची हौस ! यांना बायका नाहींत. पण शिष्य या नांवानं एक ना अनेक दत्तक पुत्र घेण्याची परवानगी. आणि विधर्मी न्यायाधिशांपुढं आपल्या संन्याशी वंशावळी मांडून हे दावे लढवितात ! सावकारी करितात. कुळांवर रयतांवर अंमल करितात. हें काय वैराग्य ? हें काय नैष्कर्म्य ? म्हणजे कर्म टाकून देऊन मोक्षमार्गाचं साधन करण्याची रीत किंवा तयारी ? आणि कांहीं हरिदास पुराणिक हेहि याच माळेंतले मणी ! तूंच ना मुंबईतल्या एका ठाकूरद्वारांत गीतामाईचं पुराण सांगणाऱ्या

पुराणिकाचं वर्णन त्या दिवशीं केलंस? काय म्हणे डोक्याला रेशमी पगडी झुळमुळयांची! अंगावर जरीचं उपरणं! हातांत हिऱ्याची आंगठी! आणखी काय सांगितलंस आठवतं का? तो पुराणिक म्हणे वरचेवर पालथी मूठ—हिऱ्याची आंगठी घातलेली मूठ—तोंडाशीं नेत होता. पुराणाच्या नांवानं बोंब मारायला येवढंच स्पष्ट म्हणायचं बाकी ठेवलं होतंस तूं! हें सर्व मी स्पष्ट बोललों याचं कारण, असल्या खोट्या वैराग्याच्या प्रदर्शनानं तुझ्यासारख्या सालस भाविक मनुष्याला चुकून वाटायचं कीं हे लोक मोक्षमार्गावर आहेत! आणि यांना ईश्वराचं, ब्रह्माचं, जगाचं खरं ज्ञान झालं आहे! पण मी तर म्हणतों कीं हे साधु, बुवा, बैरागी, मठवासी, महंत, आचार्य, हरिदास, पुराणिक यांच्यापेक्षां तूं हा विधुर, बिनमुलांचा, आईला देवासारखी मानणारा, निरुपद्रवी, पक्ष्यांना दाणापाणी घालणारा, पांथस्थांना गूळपाणी देणारा, भिकाऱ्याला भिक्षा वाढणारा, स्वतःच्या श्रमानं अंगमेहनतीनं जगणारा परोपकारी सालस कोकणी शेतकरी पुष्कळ चांगला! तुझं ईश्वरज्ञान, तुझी धर्मबुद्धि त्यांच्या धर्मबुद्धीपेक्षां अधिक निर्मळ आहे हें मी इथं आल्यापासून पाहतोंच आहे.'

'तें राहूं द्या दादा. माझी कसली स्तुति करतां? पण मी म्हणतों, माणसानं संसार केलाच पाहिजे? ईश्वराचं ज्ञान झाल्यावरहि?'

'अरे तुझ्या प्रश्नाचं उत्तर तुझ्या प्रश्नांतच दडलेलं आहे. तें असं कीं, खरं पुरं ईश्वरज्ञान म्हणजे आपण व ईश्वर हे एकच आहों हें ज्ञान—खरं कुणाला झाल्यावर मग त्यानं संसारकर्म करावं कीं नाहीं हा प्रश्न! पण तें झालं आहे कुणाला? आणि होणार तरी कसं कुणाला? तूं गणिती हिशेबानं समजतोस कीं, ईश्वर आणि तूं एकच आहेस. तितकं तुला श्रेय आहे कबूल. पण गड्या, हें ज्ञान तुला झालं होतं तर तूं तरी मग संसार कशाला केला—चालविला आहेस रे?'

'त्याचं कारण असं. दादा, संसार टाकावा असं वाटावं इतकं तें माझं ज्ञान खरं नसेल? नाहीं तर तो संसार सटता कीं आपल्या आपण!

किंवा संसार करण्याचा टाकण्याचा आणि त्या ज्ञानाचा तसा कांहीं संबंधच नसेल. तुम्हींच ना त्या ज्ञानाच्या खुणा म्हणून सांगितल्या ? त्यांतली एकहि माझ्या अंगीं आहे असं मला वाटतच नाहीं. का मला राग येत नाहीं ? का मला शेतीबागायती फायद्याची व्हावी अशी इच्छा नाहीं ? का मला माझं किंवा दुसऱ्या कुणाचं चांगलं झालं तर आनंद वाटत नाहीं अन् वाईट झालं तर दुःख होत नाहीं ?'

'आतां ठीक बोललास. तुला ईश्वरज्ञान असलं तरी असावं तितकं तसं नाहीं. आणि थोडसं आपल्यापरीनं कुणाला ईश्वरज्ञान असलं किंवा व्हावसं वाटलं तरी त्यानं संसार किंवा इतर कर्म सोडावंच असं नाहीं. हें जें तूं बोलण्यांत जाणवलंस तेंच अगदीं बरोबर आहे. त्याचं असं आहे बघ. ईश्वरज्ञान ब्रह्मज्ञान हे शब्द तोंडांत चटकन येतात खरे. पण गेनबा, मला सांग स्वयंपाक केल्याशिवाय का कुणाला अन्नाची तृप्ति लाभते ? आयता तयार स्वयंपाक भांड्यांत कुठं येऊन पडतो का ? कुणालाहि तो हातानंच करावा लागतो. तोहि हळूहळू होतो. चुलीवर भांडं ठेवल्याबरोबर एकदम पाक सिद्ध होत नाहीं. आणि शिवाय, मला खरं सांग गेनबा, लोकांनीं रांधलेल्या स्वयंपाकाचं अन्न आयतं पानावर पडलेलं अधिक गोड लागतं ? का आपण स्वतः स्वयंपाक केलेल्याचं अन्न अधिक गोड लागतं ?'

'दादा, खरं सांगूं ? आपण रांधल्या सैंपाकाचं अन्न अधिक गोड लागतं खरं. मग मन वेडं म्हणाना !'

'ठीक. मग आतां तुला मीं सांगितलं तर कळेल गीतेविषयींच्या त्या वादाचं तात्पर्य !'

'अन् दादा, गीतेबद्दल वाद ?'

'कां ? त्यांत काय झालं ? तो वाद कांहीं कुणाची कुणाला इस्टेट मिळण्याबद्दल नाहीं व नसतो. पण गीतेंत सत्यज्ञान आणि मनुष्यकर्तव्य म्हणून काय सांगितलं यापुरता, आणि तोहि प्रामाणिकपणाचा असतो. या वादांतला एक पक्षकार म्हणतो, 'माणसानं सगळं कर्म टाकावं आणि

संन्यासच घ्यावा. म्हणजे संसाराची भानगड किंवा उपाधी उरली नाहीं.' आणि दुसरा पक्षकार म्हणतो कीं, 'कर्म सोडण्याचं कारण नाहीं. मनांत आणलं तरी कर्म सोडतां येत नाहीं. कर्म तर करावं पण आपण करतों तें ईश्वराकरतां करतों अशी भावना ठेवण्याचा प्रयत्न करावा. किंवा कर्मावर अधिकार आपला, फळावर नाहीं, अशी मनाची समजूत पाडतां आली तर पाडण्याचा प्रयत्न करावा.'

'खरंच दादा, कर्म सोडावं हें कोण काय म्हणतात तें आपल्याला कांहीं म्हणे कांहींच कळत नाहीं. लहान लंगोट्या पोरांनीं संन्याशी व्हायचं कीं काय? लग्न करायचं ज्यांचं वय त्यांनीं संन्यास घ्यायचा कीं काय? प्रौढपणीं संसार नेटका करायचा, घर संभाळायचं, कुटुंब पोसायचं, मुलं लेकरं वाढवायचीं शिकवायचीं, गृहस्थाच्या रीतीप्रमाणं आल्या गेल्याचा परामर्ष घ्यायचा, कांहीं धर्मदाय धर्मकृत्याला मदत करायची, परोपकार होईल तो हस्तें परहस्तें करायचा हें सोडून देऊन संन्यास घ्यायचा? अन् दादा, सगळेच ब्रह्मचारी होऊन पुढच्या पिढीला जग बुडवायचं कीं काय? हें कधीं कुणीं सांगितलेलं ऐकलं नाहीं अन् ऐकलं तरी पटायचं नाहीं. गांवांत शंभर कुटुंबवत्सल संसारी गृहस्थ असतील तर एक संन्याशी खपेल चालेल. तें गांवाला एक भूषण म्हणून मिरवावं कीं! पण सगळेच संन्याशी झाले तर त्यांना भिक्षा कोण घालणार? पुढीला बोलावून आयतं जेवायला कोण वाढणार? नाहीं दादा, तुम्ही कांहीं तरीच सांगतां. सगळ्यांनीं संन्यास घ्यावा असं कुणी म्हणणार नाहीं, तुमची गीता सुद्धां.'

'तुझं हें बोलणं ऐकून मला फार बरं वाटलं. कारण मीं झालों तरी तुझ्याच मताचा आहें. पण तुझा थोडा गैरसमज झाला. संन्यास घ्यावा म्हणणाऱ्या लोकांचंहि म्हणणं असं नाहीं कीं, लहान पोरासोरांपासून सर्वांनीं संन्यास घ्यावा. ते झालं तरी असंच म्हणतात कीं, ज्याला ईश्वराचं खरं ज्ञान झालं त्यानं तरी संन्यास घ्यावा. मग इतर जगाच्या कामांत लक्ष घालूं नये.'

' हां चालेल. पण दादा, त्याला ज्ञान का काय तुम्ही म्हणतां तें आधीं होतं कुणाला खरं ? कारण अशा माणसाच्या अंगावरच्या खुणा तुम्ही मगाशींच सांगितल्या ना मला ? मग त्या असलेला एक सुद्धां माणूस उभ्या आयुष्यांत मीं तरी पाहिला नाहीं. काय म्हणे ? लाभाचा आनंद नाहीं, हानीचं दुःख नाहीं ? मुलगा झाला वंश चालवायला तर त्याचा आनंद नाहीं ? घरची भली गुणी कारभारीण गमावली तरी वाईट वाटायचं नाहीं ? असला दगड, नाहीं चुकलों दादा, असला ज्ञानी—मीं तर कुठं पाहिलाच नाहीं. अन् तुम्ही तरी कुठं पाहिला असेल याची शंकाच आहे. आणि बरं, असला एखादा देव माणूस कुठं तरी जगांत दिसला आणि तो संन्याशी झाला तर होईना ? पोसूं कीं त्याला आपण. तुमचे हे ज्ञानी शेकड्या हजारांनीं होतील, आणि मग छाट्या रंगवायला कावेचा दुष्काळ पडेल, तेव्हां पाहून घेऊं. पण हे मूठभर—छेः मूठभर सुद्धां खरे ज्ञानी मिळायचे नाहींत—लोक सोडून दिले तर बाकीचे जे उरले शेकडों हजारों—गांवभर शहरभर देशभर जगभर—त्यांनीं काय करावं कसं वागावं, याच्याविषयीं दोन मतं होतीलसं वाटत नाहीं दादा. मग गीता त्याचं काय सांगते तें मला ऐकायचं आहे. गीतेबद्दल वाद आहे असं तुम्ही म्हणालां म्हणून मीं माझं मत सांगितलं इतकंच.

' ठीक. मीहि तुझ्याच मताचा आहें. म्हणून या वादांत माझं म्हणणं थोडक्यांत सांगतों आणि मग आपण पुढं जाऊं. माझं मत असं कीं, जगांत शंभर लोक घेतले तर त्यांतले पंचाण्णव आपण बरे आणि आपला संसार बरा असं म्हणणारे. ते त्यांच्या स्वभावाप्रमाणं संसार करीत असतात. पूर्वीं सत्व रज तम म्हणूत तीन उपजत स्वभावगुण तुला सांगितले ना ? त्याप्रमाणं बरं वाईट वागणारे. त्यांत तामसी असतात ते स्वतःचं आणि दुसऱ्याचं नुकसान करून संसाराचा सत्यानास करणारे. रजोगुणी असतात ते नुकसान करीत नाहींत, पण केवळ आपला स्वार्थ कसा साधेल हें पाहणारे; आणि तो साधून त्या बरोबरच कुणाकडन फार बरं नाही फार वाईट नाहीं असं म्हणवून घेणारे. आणि जे

थोडे सत्त्वगुणी असतात ते यथाशक्ति आपलं आणि आपल्या समाजाचं बरं करतात. स्वार्थत्यागबुद्धिहि त्यांची दिसून येते. त्यांना धर्मबुद्धि असते. पण घरीं देवघर करावं, देव्हारा ठेवावा, त्यांत चार देव मांडावे, त्यांना स्नान घालून गंधफूल वाहावं, तीर्थ घ्यावं, नैवेद्य दाखवावा, थोडा दानधर्म करावा, भिक्षा वाढावी, आल्या गेल्याचा परामर्ष घ्यावा, कुणाशीं वैर करूं नये, कथाकीर्तनाला देवदर्शनाला जावं, आईबापाचं श्राद्ध करावं—येवढ्यावर त्यांची धार्मिक बुद्धि पुरी होते. सफळ होते. परलोक ईश्वर मोक्ष यांची कल्पना त्यांना फारशी नसते, व ती कल्पना करून घेण्याच्या खटपटींत ते फारसे पडत नाहींत. हा पंचाण्णवांचा हिशोब झाला. आतां उरले शेंकडा पांच. त्यांना मोक्षमार्गाची चाड असते. म्हणून त्यांतले कोणी विशेष रीतीनं तप, जप, तीर्थयात्रा, ध्यान, उपासना, योगसाधन असले आत्मशुद्धीचे उद्योग करितात. म्हणतात 'आपणाला सुचेल पटेल तें मोक्षसाधन करावं, त्यानं काय गति मिळायची ती ईश्वर देईल.' पण आपणाला खरं ब्रह्मज्ञान झालं असा विश्वास त्यांना वाटत नाहीं. आणि घमेंड तर नाहींच नाहीं. पण हीं सगळीं बोलून चालून काम्यकर्मं, म्हणजे ज्यांच्यापासून सद्गतीचं कांहीं विशेष फळ मिळावं अशी अपेक्षा असते अशीं. पण गीता मात्र याच्यापुढं जाते. तिची शिकवण ही कीं, असल्या काम्य कर्मांनीं कायमचा मोक्ष मिळत नाहीं. स्वर्गापर्यंत ये जा सुरू राहते.'

'बरं मग दादा, मोक्ष म्हणजे तरी काय हो? स्वर्ग नाहीं तर?'

'हें पहा, माझी स्वतःची आत्म्याविषयीं मोक्षाविषयीं कल्पना आहे आपली कांहीं एक. पण ती तुला या चर्चेंत सांगून उपयोगी नाहीं. कारण आतां आपण गीतेंत काय सांगितलं आहे येवढ्यापुरतंच बोलतों आहों.'

'वा दादा, तुम्ही तरी बरेच धीट दिसतां कीं, गीतेचं आणि तुमचं मत जुळत नाहीं म्हणायला. लोक तुम्हाला नास्तिक म्हणतील ना!'

'अरे म्हटलं तर म्हटलं. त्यांत काय? आपणाहि उलट त्यांना नास्तिक म्हणावं. तळ्यांत नदींत उतरणाऱ्यांना एकमेकांवर पाणी उडवून एक

एकमेकांचं अंग भिजवितां येतंच कीं! मत जमलं नाहीं कीं तोंडाला येईल ती द्यावी शिवी. हल्लीं आपण आपल्या गांवांतच नाहीं कां पहात, सरकारासंबंधीं स्वराज्यासंबंधीं चार मतं आहेत तीं! तो संपतराव वकील! केवळ सरकारानं त्याला रावसाहेब ही पदवी दिली म्हणून इतर कांहीं लोक कॉंग्रेसवाले त्याला सरकारजमा देशद्रोही म्हणतात ना? पण तोच आजचा पुढारी गेलीं पंचवीस वर्षं पुढारी आहे ना? दुसरा तो हिंदुसभावाला श्रीधरपंत मास्तर. त्याला कॉंग्रेसवाले म्हणतात हा 'जातवाला' याला हिंदुजाती-पुढं मोठ्या देशाचं हित दिसतच नाहीं.

'आणि श्रीधरपंताला नांवं ठेवणाऱ्या त्या रामशेट वाण्याला आणि मोतीचंद मारवाड्याला स्वतः श्रीधरपंत उलट काय म्हणतोरे?'

'म्हणतो कीं 'एक पांढरी टोपी घातली, आणि खादीचं कुडतं घातलं, आणि दिवसांतून दहा वेळ गांधी म्हाराज म्हटलं कीं बनले हे अट्टल चोर मोठे खरे देशभक्त'! पण तुमच्या सरकारच्या कामांतच हें आहे असं नाहीं, दादा. देवळांत धुमी पेटवून राख लावून बसतो आहे तो गोसावी ध्यान लावून, आज चार महिने. त्याला म्हणतात सैतानबुवा! कां तर थोडा रागीट. कुणाची पर्वा न करणारा आहे म्हणून. आणि उलट त्या धाकजीला देव माणूस म्हणतात! कां तर तो गांवच्या चटोर गुंडांना होळी-दिवाळीला पैसे पोस्त देऊन चैन करायला मदत करतो!'

'चांगलीं दिलीस उदाहरणं. म्हणूनच मी म्हणतों कीं कुणी आपल्याला नास्तिक म्हटलं तर म्हणेनात! आपण आहों ते खरे. एक बरी गोष्ट आहे कीं, जिवंतपणीं अमुक एक मत किंवा असुक एक प्रकारचं आच-रण करणाराला मेल्यावर कोणची गति मिळाली हें कळण्याचा कांहीं मार्ग, कांहीं पुरावा, जगाच्या प्रारंभापासून मिळालेला नाहीं आणि जगाच्या अंता-पर्यंत मिळायचा नाहीं! बरं पण आपला विषय सुटला. गीतेच्या मतासारखं या मोक्षाच्या बाबतींत माझं मत नाहीं, असं म्हणण्याचं धाडस तुम्ही कसं करतां असं तूं म्हणालास त्यावरनं हें निघालं. पण हें बघ! मी एक यःक-श्चित कीड-मुंगी! माझ्या मताला घेऊन काय करायचं? पण गीतेशीं न

पटणारे असे शास्त्रकार पूर्वी होऊन गेले तसे पुढंहि होतील. न पटणारे म्हणजे केवळ एखाद्या गोष्टींत. उलट गीता तरी त्यांना नांवं ठेवायची राहिली आहे काय ? आपले जुने मीमांसक म्हणून म्हणतात तेच घे ना ! केवढं मोठं धेंड होतं एकवेळ. त्यांचं म्हणणं कीं, यज्ञ हेंच काय तें एक मोक्षसाधन. आणि याला खुद्द वेदांचा आधार ! पण उपनिषदं गीता या सर्व पुढिलांनीं यज्ञमार्गाला नांवं ठेविलीं आहेत. 'फुटक्या तळाच्या भोंक पडलेल्या नावांत बसून समुद्रांत संचार करून बंदर गांठायला निघावं तशी यज्ञ-मार्ग पत्करून मोक्षाची आशा करावी ' असं उपनिषद् गीता यांनीं या मीमांसकांबद्दल उपहासबुद्धीनं म्हटलं आहे. आणि त्या जुन्या, कर्मठ यज्ञांचा आतां मागमूस तरी उरला आहे काय ? असो. गीतेचं म्हणणं असं कीं, भूतलोक, पितृलोक, स्वर्गलोक इत्यादि लोक आहेत खरे. पण आत्म्याचे ते कायमच्या विश्रांतीचे मुक्काम नाहींत. सरकारी प्रवासी बंगल्यांत जसे तीन दिवसांहून अधिक राहूं देत नाहीं, तसं पुण्य संपल्या-बरोबर त्या लोकांतून आत्म्याला निघून पुन्हां या जगांत आलं पाहिजे.'

'अन् तें कशाला ?'

'फिरून प्राप्तकर्म करून, जमल्यास पुण्य नाहीं तर पाप, पदरीं बांधून घेऊन दुसऱ्या प्रवासयात्रेवर निघण्याला. कारण मोक्ष म्हटला म्हणजे ती 'कायम' मुक्कामाची जागा ! पण तो मोक्ष कांहीं एखादा निवास नाहीं, कीं वसाहत नाहीं, कीं कायम भाडेपट्ट्यानं घेतलेला एखादा बगीचा नाहीं. कीं हंशील भरून तिकिट काढून जाण्याचा गांव नाहीं. 'मोक्षस्य नहि वासोस्ति न ग्रामांतरमेव वा ' असं वचनच आहे. मग मोक्ष म्हणतात तो आहे तरी काय आणि कुठं ? गीतेच्या मताप्रमाणं मोक्ष म्हणजे ईश्वर व जीवात्मा व सृष्टि हीं सर्व एकरूप आहेत हें ज्ञान. आणि तें माणसाला व्हायचं म्हणजे याच जन्मीं. दुसरं काय ? '

'आणि हें जर खरं म्हटलं तर मग आम्हां लोकांच्या मोक्षाच्या जुन्या कल्पना सगळ्या फुकट गेल्या ? मला वाटलं होतं कीं, पितरलोक, गंधर्वलोक तुम्ही नाकबूल कराल, पण वैकुंठ तरी कबूल कराल !'

‘ म्हणजे तोच वैकुंठ ना ? कीं, ज्यांत श्रीविष्णु शेषाच्या मऊ शय्येवर पहुडले आहेत, लक्ष्मीआईसाहेब त्यांचे पाय चेपताहेत, नारद तुंबरू गात आहेत, किंवा विठोबाचं दर्शन घेऊन एखाद्या बडव्याच्या घरीं पडशी टाकायला भक्त वारकरी जात आहेत. नाहीं, यांतहि तुझी निराशाच होणार. कारण असला वैकुंठनिवास गीतेला संमत नाहीं. गीता इतकंच सांगते, ईश्वराचं म्हणणं म्हणून, कीं ‘ ज्यांना माझं सत्यज्ञान झालं किंवा ज्यांनीं माझी खरी निःस्वार्थ भक्ति केली ते मला येऊन मिळतील मत्स्वरूप होतील. ’ यांत काय तें समज. तोच मोक्ष.’

‘ म्हणजे हा मोक्ष याच जन्मीं माणसाला लाभेल कीं ! तें ज्ञान झालं तर ? पण तुम्ही असं म्हणत नाहीं कीं हें ज्ञान झालं म्हणजे तो मनुष्य–ज्ञानी म्हणा भक्त म्हणा—मरून पडेल ! ’

‘ मी कसं म्हणेन गीतेंत नाहीं तें आपल्या पदरचं ? खरं असं आहे गेनबा, मोक्ष म्हणजे मरण नव्हे, तर केवळ मुक्तता. कशापासनं ? तर अज्ञानापासनं. असं असतां त्या मोक्षाला उगीचच मरणाची, आणि मरणानंतरच्या एखाद्या अस्वस्थेची, कल्पना जुन्या लोकांनीं चिकटवून ठेवली आहे झालं.’

‘ म्हणजे मोक्ष मिळायचाच तर या जन्मीं आणि न मिळायचा तरी याच जन्मीं ! एकूण पुनर्जन्म नाहीं असं तुम्हांला म्हणायचं ? ’

‘ नाहीं, पुनर्जन्माविषयींहि माझं स्वतंत्र मत आहे. पण गीतेचं सांगायचं तर हें कीं, पुनर्जन्म व्हायचा तरी जीवाला याच जगांत येऊन तो घेतला पाहिजे. म्हणजे मनुष्यजन्म हीच खरी भूमिका. या मनुष्यजन्मांतच पाप पुण्य यांची काय जोड कुणाला करायची असेल किंवा व्हायची असेल तर ! आणि तीहि फिरून जन्मानुरूप योग्य तीं कर्मे करून ! शेंकडा ९५ च काय पण दहा हजारांत लाखांत एखादाच खरा संन्यासी ज्ञानी निघेल. बाकी सर्वांनीं आपल्या स्थितीला योग्य तें काम करून जन्म काढला पाहिजे. मात्र तें करीत असतांच त्यांतल्या त्यांत असल्या मोक्षसाधनाचीहि कांहीं तजवीज त्याला करतां येईल असं गीतेचं मत आहे.

हठयोग भक्ति इत्यादि मार्गहि सांगितले आहेत. तथापि अशाहि लोकांना आपली आयुष्यांतलीं कामं करतां येतील, किंबहुना तीं त्यांनीं करावीं. बुद्धि शुद्ध करण्याचे सर्व प्रयत्न व उपाय करावे. आणि सर्व कर्म करिताना स्वार्थी दृष्टि न ठेवण्याची तेवढी एक खबरदारी घ्यावी. म्हणजे ईश्वरस्वरूप त्यांना खरं किती कळलं याची परीक्षा न घेतां ईश्वर त्यांना मुक्ति देतो, स्वस्वरूपांत घेतो. अशा रीतीनं आपली अध्यात्माची चर्चा पुरी झाली. अध्यात्म म्हणजे ईश्वराचं स्वरूप, परब्रह्माचं स्वरूप, सृष्टीचं स्वरूप, प्रकृतीचं स्वरूप, जीवात्म्याचं स्वरूप आणि या सर्वांचा परस्पर संबंध हें प्रथम थोडक्यांत सांगून, नंतर गीता नीतीविषयीं काय सांगते तें सांगेन असं मीं म्हटलं होतं. तेव्हां त्या चर्चेला आतां सुरवात करूं.

## संवाद् १३ वा

‘ मग दादा, त्या नीतीचा आणि या तुमच्या अवघड अवजड शब्दांचा कांहीं संबंध आहे कीं नाहीं ? का ती संसारी माणसापुरतीच ?’

‘ गीतेमध्यें वेदांत आणि नीति यांची सांगड घातलेली दिसते. म्हणून ती गांठ सोडण्याचा प्रयत्न करण्यांत फारसा अर्थ नाहीं. कारण गीतेंतल्या नीतिशास्त्राचा उगम आणि पर्यवसान दोन्हीं अध्यात्मांतच होतात हें असं दिसतं खरं ! पण मघाचच्या चर्चेच्या शेवटीं, मोक्षसुद्धां या जन्मांतच आपल्या शुद्ध आचरणानं व ज्ञानानं मिळणारा आहे येथवर आपली दृष्टि गेली. न दिसणाऱ्या परलोकाहून ती काढून अशा या जगावर आपण आणली कीं ज्यांत आपण जन्मलों राहतों वावरतों आणि मरतों. अर्थात् गीतेनं जी नीति म्हणून सांगितली ती या जगांत वावरणारा जो जीवात्मा त्यालाच, आणि या जगांतल्या जीवनालाच, उद्देशून सांगितली

असं मानलं तर फारशी चूक होणार नाहीं. आणि ईश्वराला न विसरतां, या नीतीचे नियम संभाळून, शक्य तेथवर जें शुद्ध आचरण मनुष्य आयुष्यांत करीत राहतो तोच ज्याला कर्मयोग म्हणतात तो होय. या पलीकडे जाऊन गीतेनं मनुष्याच्या व्यवहारासंबंधीं फारच थोडं सांगितलं आहे. जें सांगितलें आहे तें इतकंच कीं, मनुष्यस्वभाव जसा सत्त्व रज तम या तीन गुणांनीं बनविला आहे त्याचप्रमाणं मनुष्याची स्थितिहि चार वर्णांत वांटून दिली आहे. म्हणून जो ज्या वर्णात जन्मला असेल त्या वर्णाचं कर्म व कर्तव्य माणसानं करावं. हाच त्याचा स्वधर्म. तो त्यानं शक्य तितका पाळला, म्हणजे मग याहून फार खोलांत न शिरतांहि, त्यानं स्वधर्माचरण केलं व तो कर्मयोगी ठरला असं गीता सांगते. गीतेंत ईश्वराचंच म्हणणं म्हणून सांगितलं आहे कीं, ' मीं चार वर्ण उत्पन्न केले, आणि ते गुण व कर्म यांना अनुसरून. हे चार वर्ण कोणते हें तुला माहीत असेल, गेनबा ? '

' होय दादा. एक ब्राह्मण, दुसरा क्षत्रिय, तिसरा वैश्य आणि चवथा शूद्र.'

' आणि या वर्णाचीं योग्य कर्म कोणतीं हेंहि तुला थोडक्यांत सांगतां येईल. '

' होय दादा. ब्राह्मणाचं काम स्वतः ज्ञान मिळवून तें लोकांना द्यायचं. धर्म काय कसा तो लोकांना शिकवायचा. स्वतः पैसे मिळण्याचे धंदे करायचे नाहींत. आणि गुरु म्हणून जो कोणी क्षत्रिय, वैश्य, शूद्र, सल्लामसलत विचारील त्याला ती फुकट अन् न्यायबुद्धीनं द्यायची. क्षत्रियाला सवलत अशी कीं, त्यानं ज्ञान मिळविण्याची उठाठेव न केली तरी चालेल. ब्राह्मणानं जें करूं नये तें मांसभक्षण त्यानं हवं तर करावं, आपलं शरीरबळ वाढवावं, स्वाऱ्या–शिकाऱ्या कराव्या, आणि आपल्या शरीरबळानं समाजाचं रक्षण करण्याची जबाबदारी आपल्यावर आहे असं मानून कठीण प्रसंगाला तोंड द्यायला सर्वांपुढं व्हावं. जरूर तर लढावं आणि प्राणावर बेतलं तरी भिऊं नये.'

‘ आणि गेनबा, स्वतः तूं कोण रे ? ब्राह्मण का क्षत्रिय ? ’

‘ नाहीं. दादा, मी ब्राह्मण नाहीं, क्षत्रिय नाहीं आणि शूद्रहि नाहीं. पण वैश्य आहें. म्हणून शेतकी करतों. इतर वैश्य लोक व्यापारउदीम करतात आणि दानधर्म करतात. कारण सगळ्यांत अधिक पैसेवाले तेच असतात. आणि शेवटीं शूद्राचं काम म्हणे या सगळ्यांची सेवा-शुश्रूषा करण्याचं. ’

‘ मग, गेनबा, तुला ही वर्णव्यस्था मान्य आहे काय ? ’

‘ खरं विचाराल तर बापजाद्यांचा धंदा पुढच्या पिढ्यांनीं करावा हें ठीक दिसतं. आणि तसं करणं फायदेशीर सुद्धां होतं कीं ! कारण घरची विद्या तयार. अन् लहानपणापासून डोळ्यापुढं. तेव्हां तिचं पाऊल पुढंच पडायचं. पण, दादा, तुम्ही ते तीन गुण का काय सांगितलेत ते पाहिले तर, एकाच कुळांत एकच, अन् तोच, धंदा फार काळ टिकेलसं वाटत नाहीं. गुणाप्रमाणं धंद्याचं काम म्हटलंत तर, या तुमच्या वर्णाच्या चौक-टींत उलथापालथ व्हायची नाहीं काय ? वरच्या तीन वर्णांचं मी कांहीं म्हणत नाहीं. ब्राह्मणानं गरीबींत राहावं, अन् त्याचं धर्माचं आचरण कडक असावं हें खरं. पण हें जगणं जरा जिकिरीचंच नव्हे का ? आतां त्याला बाकीचे वर्णगुरु मानतात. आणि दानं देतात तीं ब्राह्मणालाच. तीं कांहीं क्षत्रियाला, वैश्याला, शूद्राला देत नाहींत. मिळून काय त्याला हें नाहीं तर तें मिळून कांहीं कमी पडत नाहीं. शिवाय, पहिला मान, पहिलं गंध, ब्राह्मणाला हें काय थोडं झालं ? त्याच्या पायावर सगळ्यांच्या डोई. त्यानं स्वतः कुणाच्या पायां पडण्याचं कारण नाहीं. येवढ्या प्रतिष्ठेवर त्यानं संतुष्ट रहावं कीं. क्षत्रियाचं मोठंपण सांगायलाच नको. कोणचंहि राज्य म्हटलं कीं त्याचा राजा व्हायचा अधिकार आपला त्याचा ठेवलेला. आणि तें ठीकच. कारण लोकांकरितां लढून प्राण देणार तो ! म्हणून जगांत सगळं ऐश्वर्य असतं तें राजाला मिळतं. आम्ही वैश्य लोक. आम्हांला मान प्रतिष्ठा कोणतीच नाहीं. पण जगांत सगळं सुख पैशानं मिळतं, दादा. आणि सगळ्यांत पैसा अधिक कुणाला मिळतो तर तो

आम्हां शेतकऱ्यांना, व्यापाऱ्यांना, कारखानेवाल्यांना. जगाचे पोशिंदे आम्ही, हा मान आम्हांला काय थोडा झाला ? पण शूद्रानं जन्मभर लोकांची सेवाच करावी हें मात्र मनाला मुळींच पटत नाहीं. तें न्यायाचं नाहीं वाटत दादा. त्यानं कधींच मोठं होऊं नये ? '

' तूं म्हणतोस तें अगदीं बरोबर आहे. स्वतः माझंहि मत तसंच आहे. गुणाप्रमाणं वर्णामध्यें आज उलटापालट सुरू झालीहि आहे. आणि मान्यहि होत चालली आहे. शूद्रानं डोकं पुढं काढून तरवार गाजविली कीं त्याला क्षत्रिय म्हणूं लागतात, आणि त्याचं शूद्रपण संपतं. जुन्या काळीं असंतुष्ट क्षत्रियांनीं ब्राह्मण होण्याची हौस बाळगिली आणि ती त्यांची पुरलीहि. याचं उदाहरण विश्वामित्र ऋषी. आणि ब्राह्मणांना आपण क्षत्रिय व्हावं असं वाटलं तेव्हां त्यांनाहि ती हौस फेडून घेतां आली. याचं उदाहरण द्रोणाचार्य, परशुराम, आणि परवांच्या पेशवाईतले लढाऊ ब्राह्मण. त्यांतल्या त्यांत आपल्या वर्णाचं कर्म फारसं सोडलं नाहीं वैश्यांनींच. पण तशीं सांगण्यासारखीं उदाहरणं नसलीं तरी, म्हणजे मला आठवत नसलीं तरी, आंगच्या गुणांमुळं वैश्यांनीं तागडी टाकून तरवार घेतली, राज्यं केलीं, किंवा खातेवही टाकून हातांत ग्रंथ घेतले लिहिले, अशीं उदाहरणं इतिहास पुराणकाळीं काय थोडीं घडलीं असतील ? आणि हल्लींच्या काळांत तर येऊन जाऊन लग्नाच्याच कामांत काय तो वर्णाचा जातीचा निर्बंध पाळला जातो. एरव्हीं कोणता धंदा कुणीं करावा याला आतां कांहींच नियम किंवा बंधन उरलं नाहीं बघ ! '

' पण मग दादा, हें सारं गीताशास्त्राच्या आणि देवाच्या मर्जीच्या विरुद्ध झालं असं म्हणायचं का ? '

' नाहीं, तसं म्हणण्याचं कारण नाहीं. धर्माचं स्वरूप झालं तरी वेळोवेळीं बदलतंच. असं बघ, वेदाच्या काळीं व नंतरहि कांहीं दिवस यज्ञकरणं एवढाच मोठा धर्म मानला जात होता ना ? पण स्वतः गीतेनं या यज्ञ कर्मांची निंदा केलीच कीं नाहीं ? लोकांची फसवणूक करणारे म्हणून

त्यांना म्हटलंच कीं नाहीं ? त्याप्रमाणें आज मनु याज्ञवल्क्य यांचा नवा अवतार न होवो, पण जुन्या काळासारखा एखादा पुरुष विद्येनं, तपानं, आचरणानं ऋषी म्हणण्याच्या योग्यतेचा झाला तर तोहि एखादं गीते-सारखं, निदान स्मृतीसारखं, शास्त्र लिहील आणि त्यांत सगळे आधुनिक रूढ सदाचार ठाकठिक बसवून देईलच कीं ! पण जाऊं दे. हें चार वर्णांचं वर्णन सहज ओघानं आलं. कारण आपण कर्मयोगाचं बोलत होतों. आणि कर्मयोग म्हणजे फार स्वार्थबुद्धि न ठेवतां प्रत्येकानं जिवाचा उद्योग करणं हें होय. पण हा कर्मयोगच इतका व्यापक आहे कीं, त्यांत स्वार्थ आणि परमार्थ दोन्हीं बसूं शकतात. त्यांच्यांत विरोध तर नाहींच, पण कर्मयोग आचरतांना स्वार्थ आणि परमार्थ यांना हातांत हात घालूनहि जातां येतं. कर्मयोगाच्या रथाचीं तीं दोन चाकंच म्हणेनास ? आणि लक्षांत ठेव कीं, गीतेंत नीतीला विशेष महत्त्व आहे असं जे म्हणतात त्याचं कारण हेंच कीं, एकाच नीतीचे नियम स्वार्थाप्रमाणं परमार्थहि साधून देतात. मग ज्ञान मिळविण्याकरितां ते सांगितले असं वाटलं तर कुणीं म्हणावं, किंवा कर्मयोग चांगला साधावा याकरितां ते सांगितले असं कोणी वाटलं तर म्हणावं. ती ज्याची त्याची दृष्टी झाली. पण त्यामुळं गीतेंतल्या नीतिशास्त्राला बाध येत नाहीं. तसंच हठयोग, भक्तियोग, असले योग ज्यांना आचरावयाचे असतील त्यांनाहि गीतें-तल्या नीतिनियमांनीं कोणताहि बाध येत नाहीं. एवढंच नव्हे तर, त्या योगांना ते नियम उलट उपयोगीच ठरतात. आतां व्यवहारांतल्या नीतीचे सामान्य नियम तुलाहि कांहीं माहीत असतीलच. पण गीतेंतले नियम आणखी सूक्ष्मांत खोलांत गेलेले आहेत ते ऐकून तुला आश्चर्य वाटलं तरी आनंदच होईल. पूर्वी स्थितप्रज्ञाचं, म्हणजे ज्ञान झालेल्या अधिकारी माणसाचं, वर्णन गीतेनं केलेलं मीं तुला सांगितलं त्यांत, सुखानं आनंद न होणारा, दुःखानं खिन्न न होणारा, लाभहानि हीं सारखींच मानणारा, असं वर्णन आलं होतं ना ? पण काटेकोरपणानं पाहिलं तर तीं नीतीचीं मुख्य किंवा विशेष लक्षण ठरत नाहींत.

## संवाद १४ वा.

मी आतां घाटावर जायला परत निघणार असं पाहून गेनबाला फार वाईट वाटलं. त्यानं ती गोष्ट माझ्याजवळ चारचारदां काढली. सुटी संपल्यावर मला कोंकणांत अधिक राहतां येत नाहीं हें त्याला पटलं होतं. यामुळं, पुढच्या वर्षींच्या उन्हाळ्यांत पुन्हां कोंकणांत येण्याचं आमंत्रण मला आग्रहानं देण्यापलीकडे त्याला कांहीं करतां येईना. मात्र दिवसभर त्याची चुळबुळ चालली होती. त्यावरनं असा संशय आला कीं, मला काय द्यावं याची चिंता त्याला लागली असावी. आणि चिंता अशाकरितां कीं, त्यानं मला कांहीं दिलं तर मी तें घेणार नाहीं हें त्याला माहीत होतं. द्रव्य तर राहोच, पण त्याचा पर्यायहि! हें सर्व जाणून मींच युक्तीनं तें बोलणं काढलं. म्हणालों, ‘गेनबा, इतके दिवस मी तुला गीतेवर पुराण सांगितलं त्याची बिदागी तूं मला काय देणार?’ आणि मीं न हंसता केलेला हा प्रश्न हेंच खरोखर त्याच्या मनांतल्या चिंतेला उत्तरच मिळाल्यासारखं झालं. कारण भलेपणानं उलट त्याला हेंच म्हणावं लागलं कीं, ‘दादा, तुमची योग्यता केवढी! तुम्हांला मी काय देणार? चार दिवस पुराणिक झालां म्हणून?’ तुम्हाला कांहीं देणार आहें असं त्यानं म्हणणं शक्यच नव्हतं. उलट तो असंहि म्हणाला कीं, ‘बरोबर देशावर न्यायला तुम्हाला पुष्कळ द्यावसं वाटतं, पण तें जाणार कशातनं? पुढच्या वर्षी पुन्हां या ठिकाणांत येऊन राह्यचं वचन द्याल, तर उलट मलाच तुमच्याकडन सगळं कांहीं मिळालं. तुम्हांला तर मी कांहीं देतच नाहीं. पण इतके दिवस प्रेमानं वागलां, गीता सांगितलीत, हे काय उलट थोडे उपकार माझ्यावर झाले?’

हा देण्याघेण्याचा प्रश्न अशा सफाईनं निकालांत निघाला तो मला बरा वाटला. पण त्याच्याकडून मी कांहीं तरी मागून घेतलंच असंहि त्याला वाटावं म्हणून म्हणालों, ‘गेनबा, ठरलं तर मग. मी पुढच्या वर्षी पुन्हां कोकणांत येणार आणि तुझ्या ठिकाणांत राहणार. आणि हक्कानं

हो ! उगीच तुझी मेहरबानगी म्हणून नव्हे. मी आधीं तुला पत्र लिहीन. आणि तूं माझी झोंपडी साफ झाडून, सारवून, आणि आंगण नीट करून ठेव म्हणजे झालं.' हें ऐकून मात्र त्याला आनंद वाटला आणि तो म्हणाला, 'हां तें करीन सारं. आणि मोबदलाहि पण घेईन तुमच्यापासनं. पण पुढच्या वर्षीं मला तुम्ही कशावर पुराण सांगणार, दादा ?'

मी म्हणालों, 'अरे वेड्या, यंदा गीता सांगितली तेवढ्यानं ती संपली असं का तुला वाटतं ? वर्षानुवर्ष गीतेवर पुराणं कुणीं सांगितलीं तरी तीं संपायचीं नाहींत.'

'पण दादा, मला दुसरा शब्द तोंडी येईना म्हणून मी तुम्हांला पुराणिक म्हटलं, तर तुम्हीहि आपणाला पुराणिकच म्हणतां कीं ! तुमच्या त्या कालेजातनं पुरफेसर असतात, शास्त्रीपुराणिक नसतात.'

'अरे तूं वेडा आहेस. पुराणिक या शब्दानं तूं माझा अपमान केलास असं का तुला वाटलं ? भारत भागवत सांगणारे सारे पुराणिकच होते. मात्र ते तुझ्या मुंबईच्या ठाकूरद्वारच्या किंवा इतर देवळांतल्यासारखे स्वार्थी, भाडोत्री, बिदागीवर लक्ष ठेवणारे नव्हते एवढाच फरक. आतां तूं म्हणालास आमच्या कालीजांत शास्त्रीपुराणिक नसतात, हें खरं आहे. पण त्याचीं कारणं आहेत बाबा ! अजून आमच्या कॉलेजांतनं संस्कृत सुद्धां इंग्रजींतनं शिकवितात, आणि इंग्रजींतनं परीक्षा घेतात ! बिचाऱ्या शास्त्री-पुराणिकांना इंग्रजी येत नाहीं त्याला, काय करणार ? शिवाय आम्ही इंग्रजी प्रोफेसर लोक त्यांना योग्य तें महत्त्व देत नाहीं. त्यांच्या जुन्या वळणाकड पाहून मनांतनं त्यांची हेटाळणीहि करतों. पण तसं पाहिलं तर एकेका प्रोफेसराच्या पगारांत दोन दोन शास्त्री इतके विद्वान् ठेवतां येताल कीं, त्यांतला एकएक शास्त्री दोनदोन प्रोफेसरांना संस्कृत शिकवील. पण जाऊं दे. तुझ्या ठिकाणांत यंदा कोण येऊन राहिलं होतं असं कोणीं विचारलं तर खुशाल सांगत जा कीं, देशावरचा एक पुराणिक आला होता म्हणून !'

'हां दादा, तुम्हांला पुराणिक हें नांव आवडलं तर मलाहि तें

आवडतंच कीं! पण आमचा मुंबईतला पुराणिक काय कपाळ सांगणार गीता तुमच्यापुढं! पण काय हो दादा, मी ऐकतों कीं, पुण्याचा तो टिळक बामण होता तोहि म्हणे गीता सांगत होता? अन् तो पुरफेसर, शास्त्री, पुराणिक यांपैकीं कुणींच नव्हता! आणि म्हणे त्यानं गीताहि लिहिली? आणि गीता सांगण्याकारितांच कांहो त्याच्यावर मुंबईतल्या हायकोर्टांत खटला झाला आणि शिक्षा झाली?'

मीं थोड्या कौतुकानं विचारलं, 'बाकी मग सांगेन गेनबा, पण टिळकांच्यावर खटला झाला, शिक्षा झाली, हें काय तुला माहीत?'

गेनबा म्हणाला 'वा:! तें मी असंतसं कसं विसरेन! तेव्हां मी गिरणींत कामावर होतों. गिरण्या दोन दिवस बंद झाल्या. दंगे झाले. पोलिसांनीं गोळीबार केला. आणि मी त्यांतून मोठ्या दैवान वांचलों म्हणून माझ्या आईनं देवाला नेवेद्यहि केला होता.'

'ठकि, मग आतां सांगतों सारं. टिळकांवर खटला झाला तो गीता सांगण्याकरितां झाला नाहीं. केसरी म्हणून त्यांचं वर्तमानपत्र होतं त्यांत कांहीं लिहिल्याबद्दल खटला झाला. मात्र टिळकांनीं गीतेवर मोठं पुस्तक लिहिलं आहे. इतकं चांगलं कीं, जुन्या काळच्या एखाद्या ऋषीनंच लिहावं. पण ते कांहीं पुराणिक नव्हते हो. गृहस्थ होते. सरकाराशीं भांडणारे एक पुढारी होते. त्यांनीं वेदावर इंग्रजींतहि पुस्तकं लिहिलीं आहेत.'

हें ऐकून टिळकांविषयींचा आदरभाव गेनबाच्या तोंडावर व डोळयांत एकदम चमकला. तो म्हणाला—'बघा कसा ईश्वर अन्यायी तो? टिळकांना वेद येत होता. आणि इंग्रजीहि पण येत होतं? आणि देवानं मला नीट मराठीहि दिलं नाहीं!'

'वा:! सगळं रामायण ऐकून रामाची सीता कोण म्हटल्यासारखं, तूं इतकी सारी गीता ऐकून, ईश्वराला अन्यायी म्हटलंसच.'

या माझ्या वावदुकीनं गेनबा थोडासा विरमला खरा. पण तो म्हणाला, 'दादा खरंच सांगा, माझ्यासारखा असा हा सारा जन्म अज्ञानांत जावा याचं दुःख मला वाटूंच नको का? आणि वाटलं तर मग मीं

आपल्या कर्माला दोष द्यावा असं म्हटलं, तरी शेवटीं तो ईश्वरालाच लागतो कीं नाहीं ? कारण तुम्हींच मला मागं पुराणांत सांगितलंत कीं, माणसाला झालं तरी मूळ ईश्वरानंच कर्मावर घातलं! मी भांडणार देवाशीं, म्हणणार असं कर्म मलां कां लाऊं दिलंस मुळांत, कीं मला गीता समजूं नये आणि मी अज्ञानांत राहावं ?'

त्याचा हा सात्विक खेद नाहींसा व्हावा म्हणून मी म्हणालों, 'पण गड्या, तूं मोठा ज्ञानी झाला असतास, तुला गीता वाचून समजली असती, शिवाय लोकांना सांगतां आली असती, तरी काय झालं! एक महिनाभर तुझ्या घरीं राहून तुझं चरित्र मीं डोळ्यांनीं पाहिलं. तेव्हां खात्री झाली कीं, तुझ्यासारखीं न शिकलेलीं पण सात्विक मनाचीं आणि खऱ्या धर्मानं वागणारीं माणसं फार थोडीं भेटतात! तुझा संतोष पाहून आनंद होतो. तुझ्याबद्दल लोक गांवांत चांगलं बोलतात तें कानावर येतं. तुझ्या दाराशीं कोणी आला तर मोकळ्या हातानं परत जात नाहीं. तूं आपल्या आईची सेवा देवासारखी करतोस. देवाला अन्यायी म्हणतांना तुझ्या हें लक्षांत येत नाहीं कीं, असेहि लोक आहेत कीं ज्यांना गीतेचं आणि ज्ञानेश्वरीचं अर्थज्ञान झालं पण ज्यांचं ज्ञान पोथींतच गुंडाळून राहतं. बाहेर संसारांत वागतांना लोभबुद्धीची पराकाष्ठा केली, कलह केले, सांप्रदायाचं अवडंबर माजविलं, शिष्यांना लुबाडलं, असे किती लोक सांगूं ? गीतेचं अर्थज्ञान त्यांना देवानं दिलं खरं, पण समाजांत त्यांची अपकीर्ति करून त्याचा बदला घेतलाच कीं नाहीं ? अरे, देवाला तुझ्यापेक्षां न्याय अन्याय अधिक कळतो. आणि तुला जें पटत नाहीं तें फिरून एकवार सांगतों—देवाला जर 'मनुष्यासारखं' मन असेल तर त्याला खेळ करायला आवडतं यांत शंका नाहीं. कर्माची पुढची जबाबदारी ज्याची त्याच्यावर लादली तरी, त्या अलीकडची पहिली जबाबदारी, त्या माणसाचं तसलं कर्म मूळ निर्माण करण्यांत, आणि तसले गुण त्याला देण्यांत, ईश्वरावरच पडते कीं नाहीं ? मात्र त्याचा अर्थ हाच कीं, तुला मला दिसतो तो देवाचा अन्याय नाहीं तर खेळ म्हणावा! समज त्यानंच

खेळाकरितां असं ठरविलं होतं कीं, यंदां मी इथं येऊन तुझा पाहुणचार घ्यावा ! यांत माझ्यावर तुझा उपकार झाला त्याहून मीं तुला थोडीशी गीता शिकविली त्याचाच उपकार तूं अधिक मानावास ! हा गमतीचा खेळ देवाला पहायचा होता असं बोलावं तेव्हांच सगळं संपतं. म्हणून तूं आतां असं कर कीं, पुढच्या वर्षी गीता आणखी ऐकायची आहे अशी हौस मनांत बाळग, आणि तूं हल्लीं देवमाणसासारखा वागतोस तसाच वागत जा. तुझ्यासारख्या सात्विक माणसाचं उदाहरण बरोबर देशावर नेऊन माझ्या मित्रांना सांगतां आलं हेंच मला मोठं बक्षीस होईल.'

मग तो मोठ्या प्रेमळपणानं मला म्हणाला 'दादा, तुम्ही आतां जाल, आणि पुढच्या वर्षी या दिसां तुम्ही परत याल, तोंवर तुमची आठवण मला मनानं राहील खरी. तरी पण तुमच्या हातचं काय देऊन ठेवतां मला ?'

गेनबा हें कोणत्या अर्थानं बोलला हें ध्यानांत येऊन मी म्हणालों 'ठीक विचारलंस. हें पहा गीतेच्या मराठी भाषांतराचं लहानसं पुस्तक, हें मी तुला देतों तें नीट ठेवशील ? आणि तुला बाळबोध वाचतां येतंच. तेव्हां रोज दुपारच्या उन्हाच्या वेळीं, त्या तुळशीकट्यावर झाडाच्या सावलींत बसून, त्यांतला थोडथोडा भाग ओळीनं वाचीत जा. कळेल तें कळेल. न कळेल तें न कळेल.'

गेनबानं तें पुस्तक उचलून घेऊन मोठ्या भक्तीनं आपल्या कपाळाला लावून मांडीवर ठेऊन दिलं. आणि म्हणाला 'दादा, तें मी वाचीत जाईन नेमानं. पण मला सांगाल का, कीं गीतेच्या या साऱ्या पुस्तकांतलं तुम्हांला त्यांतल्या त्यांत अधिक काय आवडतं तें ?'

मी हांसून वरकरणी म्हणालों 'अरे वेड्या, अशा पवित्र ग्रंथांतलं सगळंच पवित्र असतं. देवाच्या प्रसादाच्या फुलांत एक अधिक चांगलं फूल एक कमी चांगलं फूल असं कुणी मानतं कां ? निवडतं कां ? तसंच झाडावरून निघालेलीं सगळीं फुलं देखील सारखींच नसतात कां ?'

'तें नका सांगूं दादा तुम्ही. प्रसादाच्या फुलाचं मी कांहीं बोलत नाहीं

पण खायकरितां झाडावरन काढलेल्या फळांत तरी, हा आंबा चांगला हा सुमार असं तुम्ही निवडतांच कीं नाहीं ? तसं विचारलं मीं.'

गेनबाला मोघम बोलून मी डावलणार होतों. कारण तो गुरुमुखाच्या सहायाशिवाय काय वाचणार, अन् त्याला काय समजणार, आणि तो काय चांगलं वाईट ठरविणार हें मी ओळखीत होतोंच. पण त्यानं दाखविलेला तर–तम भाव गीतेविषयीं मला मनांतून खरा वाटत नाहीं हें बोलणं प्रामाणिकपणाचं झालं नसतं. तेव्हां सत्याला जागावं, आणि उपयोगाचंहि करावं, म्हणून मी म्हणालों ' बरं आहे गेनबा, गीतेंतलं मला सर्वांत अधिक काय आवडतं तें मीं सांगतों.'

आणि असं म्हणून मी त्याला गीतेच्या सातशें श्लोकांपैकीं मला विशेष आवडणारे सात श्लोक सांगितले. गीतेच्या पुस्तकाच्या त्या त्या पानांत कागदाच्या खुणा चिकटवून, आणि शिवाय त्या त्या श्लोकांच्या बाजूला ओल्या कावेच्या रेघा ओढून देऊन, मी म्हणालों ' जाण्यापूर्वीं एकदां त्या सात श्लोकांची संथा देईन मी तुला. आणि मी पुढच्या वर्षीं इथं परत येईन तोंपर्यंत ते तूं पाठ करून ठेवले पाहिजेस.'

ते सात श्लोक हेः—

( १ ) नियतं कुरु कर्म त्वं कर्मज्यायो ह्यकर्मणः
शरीरयात्रापिच ते न प्रसिध्येदकमणः

( २ ) यद्यदाचरति श्रेष्ठः तत्तदेवेतरो जनः
सयत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते

( ३ ) उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत्
आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः

( ४ ) मत्तः परतरं नान्यत् किंचिदस्ति धनंजय
मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव

( ५ ) मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियो वैश्याः तथा शूद्राः तेऽपि यांति परां गतिं

( ६ ) संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः
मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मे भक्तः स मे प्रियः
( ७ ) सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः

मग गेनबाचं अंतरंग पाहण्याकरितां मी म्हणालों 'गेनबा, तूं जन्मभर चांगला शुद्ध आचरणानं देवावर श्रद्धा ठेवून वागलेला दिसतोस. तुला परलोकीं मोक्ष मिळण्याचा संभव वाटतो मला.'

गेनबा म्हणाला 'करा थट्टा, दादा, गरीबाची. मी कुठं अन् मोक्ष कुठं? पण खरंच सांगू का? दादा, मोक्षापेक्षां मला हा जन्मच बरा वाटतो. मला वाटतं या जन्मांतच मोक्षाचं सुख माणसाला मिळतं कीं'

'तें कसं? केव्हां? सांगशील का मला?'

'मला खरा आनंद होतो तेव्हां.'

'सगळ्या आनंदाच्या प्रसंगीं एकसारखाच आनंद?'

'म्हणजे कसं?'

'मी उगीचच आपली कल्पना करून सांगतों हं तुला आनंद वाटण्या-सारखे प्रसंग कोणते येण्याजोगे असतील ते—

१ तूं मुंबईकडून आगबोटींतून आलास. मोठं वादळ झालं समुद्रावर. बोट बुडणारसं वाटलं. पण शेवटीं तूं बंदरांत येऊन सुखरूप उतरलास.

२. रात्रीं रानांत वाघरूं उठलं. त्यानं तुझ्या गोठ्यावर झडप घातली. पण तूं व शेजाऱ्यांनीं मिळून त्याला ठार केलंत.

३. तुझ्यावर तुझ्या भागेल्यानं खोटा दावा कोर्टात केला, आणि उगीचच हजार रुपयांचा चाट बसणार होता तुला! पण कोर्टानं दावा रद्द करून तुझा खर्च देववला.

४. तुझ्या आगरा शेजारच्या जमिनीचा तुकडा तिसऱ्या कुणीं घेतला असता तर तुझ्या नुकसानीला कारण झालं असतं, पण तो तुला थोड्या पैशांत मिळाला.

५. तुझी पहिलटकरीण गाय सुखानं व्याली.

६. तुझ्या बापाच्या श्राद्धाच्या दिवशीं त्याच्या आवडीच्या झाडावर फणस पिकला, म्हणून तुला त्याचे गरे बामणाला द्यायला सांपडले.

७. तुझ्या शेजाऱ्याची मुलगी तुला फार आवडणारी. तिचा बाप दरिद्री. पण तुझ्या प्रयत्नानं व खर्चानं तिचं लग्न होऊन फार चांगलं स्थळ मिळालं तिला. आणि तिला झालेला पहिला मुलगा तिनं आणून तुझ्या पायावर घातला, आणि आनंदाश्रू आले तुम्हां दोघांना.

८. गांवच्या देवीच्या उत्सवाचा तंटा लागला. अगदीं हाणामारी-पर्यंत प्रकरण आलं. पण सर्वांनीं मिळून तुला पंच नेमून तुझा न्याय मान्य केला, आणि तुझा सन्मान करावा म्हणून तुला पहिलं गंध लावलं.

९. तूं मुंबईहून आंब्याच्या झाडावर मारण्याकरितां गंधक आणि पिचकारी आणलीस. तिचा उपयोग तूं गरिबांना स्वतः जाऊन करून दिलास. तेव्हां त्या वर्षीं मोहोरावरची कीड मरून फार बहार धरलेला पाहून लोकांनीं तुझे उपकार मानले.

१०. तुझ्या आईला पोटदुखीचा आजार होता. तो नवस करून बरा झाला.

हें काल्पनिक आनंद–पुराण वाचून मी म्हणालों, ‘ गेनबा, बोल या प्रत्येक प्रसंगीं तुला आनंद होणार तेव्हां तें मोक्षाचं सुखच वाटतं ना तुला ? ’

गेनबा गंभीर होऊन म्हणाला, ‘ काय पण नामी उदाहरणं दिलींत ? जशीं कांहीं तुमच्या माहितीचीं खरीं घडलेलीं. या सर्व प्रसंगांत मला आनंदच वाटेल. सुख होईल. पण, मला खरं सुख केव्हां वाटतं सांगूं ? विश्वास ठेवाल तुम्ही ’ ?

‘ सांग सांग. ’ मी उत्सुकतेनं म्हणालों.

‘ सांगतोंच तर. मातर खरं माना. मी रोज स्नान करून, हातानं झाडा-वरचीं फुलं काढून, तुळशी कट्ट्यावरच्या देवावर पाणी घालून, गंध लावून तीं फुलं देवावर वाहतों. आणि अर्धी घटका तरी अगदीं निवांत बसतों. त्यावेळीं मला कुणी हाक मारली तरी ऐकूं येत नाहीं. ’

'अन् तेव्हां डोळयापुढं काय दिसतं तुझ्या ?'

'डोळयापुढंच काय पण मनांतहि कांहीं म्हणजे कांहींच येत नाहीं. तो आनंद, तें सुख, मला त्या तुमच्या उदाहरणांतल्या पेक्षां अधिक बरं वाटतं दादा !'

'पण त्याचं कारण ?'

'त्याचं कारण असं. त्यावेळीं मीं सगळं कांहीं संसारांतलं जगांतलं विसरून जातों. मनांत देवच भरल्यासारखं वाटतं.'

'पण ती अर्ध घटका गेली म्हणजे पुन्हा कामाला लागतोस कीं ?'

'कां नाहीं लागायचं दादा ? संसार सोडून काय करायचं ? माझ्या गांवचा सुतार कामाला इथं येतो तेव्हां पाहतो ना ? पुष्कळ वेळ हत्यारांनीं काम दिलं म्हणजे मग, तो पाव घटका थांबून त्या हत्यारांना धार लावतो दगडावर. अन् बोथट झालेलं हत्यार त्याला पुन्हां चांगलं काम देऊं लागतं. तसं होतं मला तुळशी कट्यावरच्या त्या अर्धघटकेमुळं. मन पुनः कस अगदीं प्रसन्न आनंदी !'

मी चकितच झालों हें ऐकून. आणि त्याच्या पाठीवर मोठ्या प्रेमानं हात फिरवून म्हणालों, 'धन्य आहेस गेनबा. मोक्ष म्हणजे आणखी कांहीं वेगळा आहे असं मला वाटत नाहीं. असा आनंदमय संसार जो करतो तो गीता वाचून तरी दुसरं काय करील ?'



# गीता तात्पर्य

## ( १ ) अध्यात्म

ज्ञानी मनुष्य मृतांचा शोक करीत नाहीं. कारण मृत हे पूर्वी होते व आज मेले तरी पुन्हां जन्माला येतीलच. तसेंच आत्मा हा अमर असून नवीन नवीन देह घेत असतो. सुख व दुःख या गोष्टी फक्त देहाच्या इंद्रियांना बाधणाऱ्या आहेत. जो त्या मानीत नाहीं त्याला अमृत ब्रह्माची प्राप्ति होते. जें पूर्वी नव्हतें तें जगांत येत नाहीं, आणि जें आज आहे तें नाहींसें होत नाहीं. आत्मस्वरूप ब्रह्म हें अव्यय व अविनाशी आहे. केवळ देहच नाश पावतात. म्हणून ‘ अेकानें दुसऱ्याला मारलें ’ किंवा ‘ दुसरा अेकाकडून मारला गेला ’ हें अज्ञानाचें बोलणें होय. आत्मा हा न तुटणारा, न जळणारा, न भिजणारा, न सुकणारा— शिवाय नित्य, सर्वत्र भरलेला, स्थिर, अचल व सनातन आहे. त्याला विकाराची बाधा होत नाहीं. आणि त्याचें रूप मनाला कळत नाहीं. सर्व भूतें मात्र प्रारंभीं व शेवटीं अव्यक्त असतात, मात्र मध्यंतरीं केव्हां तीं व्यक्त रूप घेतात.

मनुष्याला जसा पुनर्जन्म, तसा मायेनें घेतलेला अवतार हाहि ईश्वराचा पुनर्जन्मच म्हणावा. प्रत्येक युगांत धर्मसंस्थापना नव्यानें करणें हाच ईश्वरी पुनर्जन्माचा हेतु असतो.

जी प्रकृति म्हणून आपण म्हणतों ती आठ प्रकारांची–भूतांची–मिळून झालेली असते. पण याहून श्रेष्ठ प्रतीची दुसरी प्रकृति म्हणजे ती स्वतः जीवभूत परमेश्वर हीच होय. आणि या दोन प्रकृतींपासूनच सर्व भूतें उत्पन्न होतात. पण ईश्वराचें व्यक्त रूप हेंच ईश्वराचें खरें रूप असें मानणें हें अज्ञान होय.

अव्यक्तापासून व्यक्त होणें, आणि फिरून व्यक्त भूतें अव्यक्तांत लय पावणें, याला वाटलें तर दिवस व रात्र याची उपमा द्यावी. पण या

व्यक्त-अव्यक्ता पलीकडे सनातन अव्यक्त, म्हणजे सर्व भूतें नाहींशीं झालीं असतांहि उरणारा, असा एक परम पुरुष आहे. तोच अक्षर परम पुरुष आणि जीवाची अखेरची गति होय. त्याला जाऊन पोंचलें म्हणजे जीवाला पुनर्जन्म नाहीं. याच्या उलट चंद्रलोकाला गेलेले आत्मे परत येतात. सर्व जग ईश्वरानें आपल्या अव्यक्त रूपानें विस्तारिलें आहे. व्यापिलें आहे. भूतें उत्पन्न करणारा ईश्वराचा आत्मा भूतें धारण करूनहि पुन्हां भूतांत नसतोच ! त्यांना पुनः पुन्हां उत्पन्न करून ईश्वर मात्र स्वतः उदासीनासासारखा राहतो. म्हणून त्याला कर्मे बाधत नाहींत.

**उत्पत्ति, स्थिति, लय** हीं सर्व ईश्वरच आहे किंवा तो करितो. कर्मयोगी पुरुषाचा योगक्षेम तोच चालवितो. उपासना व भक्ति हें त्याप्रत जाण्याचें एक साधन आहे. भक्तानें अर्पण करावयाचें तें सर्व त्यालाच भक्तीनें अर्पण करावें. मग तो कोणत्याहि वर्णाचा, किंवा स्त्री किंवा पापी, असला तरी त्याला परम गति मिळेल. प्राणिमात्रांचे भाव ईश्वरापासून उत्पन्न होतात. निरनिराळ्या विभूति हीं त्याचींच रूपें होत.

योगी लोकांत उत्तम योगी तो कीं जो श्रद्धा ठेवून ईश्वराची उपासना करतो. ज्ञानयोगीहि त्यालाच जाऊन पोंचतात. पण अव्यक्ताची उपासना व सर्व भूतांचें हित साधण्याचा प्रयत्न या गोष्टी अधिक कठीण असतात. त्या मानानें भक्ति सोपी. आतां अभ्यासानें कठीण गोष्टहि सोपी होते. परंतु अभ्यासापेक्षां ज्ञान चांगलें, ज्ञानापेक्षां ध्यान चांगलें, आणि ध्यानापेक्षांहि कर्मफलाचा त्याग हा चांगला. कारण फलत्यागानें एकदम शांतिच मिळते. आतां भक्तानेंहि आणखी कांहीं कांहीं गुण आंगीं आणले तर ते चांगलेच !

क्षेत्र म्हणजे शरीर व क्षेत्रज्ञ म्हणजे ईश्वर. म्हणून क्षेत्रज्ञान व क्षेत्रज्ञज्ञान मिळून परमेश्वराचें ज्ञान होय. सविकार क्षेत्र हें ३१ तत्त्वांचें होतें. ज्ञान म्हटलें म्हणजे त्याचीं ठराविक लक्षणें आहेत. या व्यतिरिक्त तें अज्ञान. अक्षर परब्रह्म हें ज्ञेय होय. प्रकृति व पुरुष हीं दोन्ही अनादि. विकार व गुण हे प्रकृतीपासून होतात. पुरुष हा प्रकृतींत अधिष्ठित झाला

म्हणजे मग तो गुणांचा भोग घेतो. प्रकृति ही कर्त्री व आत्मा हा अकर्ता आहे. परमात्मा शरीरांत राहूनहि कांहीं करीत नाहीं, म्हणून त्याला कर्मबाधा नाहीं.

प्रकृति ही त्रिगुणात्मक आहे. ते तीन गुण आत्म्याला देहांत बांधून ठेवतात. हीन गुण उच्च गुणांहून वरचढ होण्याचा प्रयत्न करतात. पण मुमुक्षूनें श्रेष्ठ गुणाकडून हीन गुणावर ताबा मिळविला पाहिजे. त्रिगुणातीत होणें म्हणजे काम्य कर्म टाकणें व मायेंतून सुटून परब्रह्म ओळखणें. परमात्म्याचा सनातन अंश कर्मभूमींत जन्मून जीवात्मा होतो, देह धारण करितो, आणि अन्नादिक पचवितो. प्रकृतीचें अव्यक्त स्वरूप तें अक्षर व नाशवंत तें क्षर. त्रैलोक्यांत भरलेला व त्रैलोक्याचें रक्षण करणारा तोच पुरुषोत्तम.

दैवी संपत्ति व आसुरी संपत्ति अशा दोन संपत्ति आहेत.

कर्म करणें तें शास्त्रयुक्त करावें, आणि शास्त्र न कळलें तर श्रद्धा ठेवावी. आहार, बुद्धि, यज्ञ, तप, दान हीं गुणाप्रमाणें वेगवेगळीं असतात. फलाशा न सोडणाराला इष्टानिष्ट फळ मिळतें. फलाशा सोडणाराला फल बाधत नाहीं.

संन्यास म्हणजे काम्य कर्मांचा त्याग. आणि त्याग म्हणजे कर्मफलांचा त्याग. त्याग व संन्यास हे त्रिगुणात्मक आहेत. कर्माचीं कारणें पांच—अधिष्ठान, कर्ता, करण, चेष्टा व दैव. ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता ही तीन प्रकारची कर्मचोदना, आणि करण, कर्म व कर्ता हा तीन प्रकारचा कर्मसंग्रह आहे. त्यांतील ज्ञान कर्म आणि कर्ता हीं त्रिगुणात्मक आहेत. तशीच बुद्धि धृति हींहि त्रिगुणात्मक आहेत. त्रिगुणापासून आकाशांत पृथ्वीवर किंवा देवलोकींहि कोणी सुटलेला नाहीं. ईश्वर हा सर्वभूतांच्या हृदयांत राहून यंत्रावर चढविल्याप्रमाणें त्यांना मायेनें चालवितो. म्हणून मोहामुळें कर्म न करावसें वाटलें तरी प्रकृति तें करविते.

## ( २ ) नीति.

वर्णधर्मशास्त्राप्रमाणें क्षत्रियाचा धर्म युद्ध करणें हा आहे. धर्मोचित युद्धापेक्षां त्याला अधिक यशस्कर दुसरें नाहीं. युद्धपराङ्मुख क्षत्रियाला पाप लागतें आणि इतकी मोठी दुष्कीर्ति जडते कीं, त्यापेक्षां त्याला मरण बरें. मात्र युद्धाला उभें राहणारानें जय—अपजय लाभ—हानि हीं सारखींच समजावीं. स्वधर्म पूर्णपणें पाळून तडीला नेतां न आला तरी हातून होईल तेवढा आचरावाच. तो स्वधर्म न आचरल्यानें मात्र संकटें व भयें उत्पन्न होतात. म्हणून बुद्धि एकाग्र करून स्वधर्मपालनाविषयीं निर्णय व निश्चय करावा. याचेंच नांव आत्मनिष्ठ होणें हें आहे. अशा आत्मनिष्ठ माणसाला दिसण्यांत धार्मिक पण स्वरूपतः काम्य अशीं कर्में करण्याचें कारण नाहीं. कर्म करण्यापुरताच मनुष्याला अधिकार आहे, पण फलाची अपेक्षा करण्याचा नाहीं. आणि हावरेपणा तर अगदींच निषिद्ध. पण फलाची अपेक्षा नाहीं तर कर्म तरी कां करावें असें म्हणू नये. कर्म तर करावें, पण फलाच्या अपेक्षेमुळें बुद्धीच्या समत्वाला, म्हणजे बुद्धियोगाला, धक्का बसतो. म्हणून एका अंगानें त्याग व एका अंगानें स्वीकार यांतच ज्याचें चातुर्य दिसून येतें त्यालाच कर्मयोगी म्हणतात. स्थितप्रज्ञ म्हणतात तो हाच. या बुद्धियोगाच्या अभ्यासानें विषयांच्या गोडीसह स्वतः विषय हे नावडते होत जातात. उलट इंद्रियें न आवरून विषयांचें चिंतन केल्यास विषयांची संगत वाढून षड्रिपू प्रबळ होतात, आणि शांति व सुख हीं दोन्ही नष्ट होतात. ही शांति मिळण्याला ममत्व व अहंकार हे नष्ट व्हावे लागतात, व ते नष्ट व्हावे तर माणसानें फलावरची दृष्टि काढून घेऊन निस्पृह बनलें पाहिजे. समजून उमजून कर्म न केलें तरी प्रकृतीचे गुण कर्म करण्याला लावतातच. मग आपण होऊनच बुद्धियोगपूर्वक कर्म अंगिकारणें हें अधिक बरें नव्हे काय? प्रकृतीनें जुलमानें आपल्या हातून करविलेल्या कर्मापेक्षां, आपणच इच्छेनें पण विवेकानें कर्म केलें तर तें अधिक बरें.! कर्मफलाची आशा कमी होण्याला एक उपाय असा कीं त्या फलांत

आपणाबरोबर इतरांनाहि अंशभागी करावें. किंबहुना त्यांना अधिक द्यावें व आपण कमी घ्यावें. याचेंच नांव यज्ञ. आणि या यज्ञाच्या परंपरित आचरणावरच जग जगतें. बरें, स्वतः आपण एकटे कर्मापासून दूर राहिलों तरी जगांत आपणच कांहीं एकटे नाहीं. म्हणून त्यांच्याकरितांहि, म्हणजे लोकसंग्रहाकरितां, कर्म केलें पाहिजे. आणि आपणांहून अज्ञानी अशा लोकांबरोबर संबंध आला तर, वरकरणी त्यांना उदाहरण घालून देण्याकरितां तरी आपण कर्म करावें व त्यांच्याकडून करवावें. पण आपण पडलों ज्ञानी, म्हणून आपण मात्र फलाची आशा न ठेवतां कर्म करावें. हेतु हाच कीं, आपण कर्म सोडलें तर, कदाचित तो आपल्या आत्मनिष्ठेचा एक परिणाम होईल; पण अज्ञानी लोकांना आत्मनिष्ठतेचा तर लाभ नाहीं आणि त्यांचें नित्य कर्महि सुटतें. आपलें कर्तव्यकर्म करतांना त्यांचें पालन ही मुख्य गोष्ट आहे. मग त्यांत कर्मपद्धतींचें किंचित् वैगुण्य असलें तरी चालेल.

मोक्षाची इच्छा धरणाऱ्या पूर्वींच्या लोकांनींहि कर्मच केलें. पण त्यांपैकीं ज्यांनीं कर्मफलाची आशा ठेविली त्यांनीं तें फल त्वरित मिळावें म्हणून इतर गौण देवतांची पूजा केली. आणि तें खरोखर अकर्म असतां त्यांना कर्म वाटलें. पण फलाशाविरहित कर्म तेंच खरें कर्म, म्हणून ज्ञानी हा सदा तृप्त मनानें कर्म करीत असतो. मनांत म्हणतो कीं, " यदृच्छेनें जें फळ मिळेल तें मिळेल. मी सुख दुःख मानणार नाहीं, कुणाचा मत्सर करणार नाहीं." आणि असें कर्म केल्यानें कर्मदोष लय पावतो, आणि कर्मबंधामुळें प्राप्त होणारा पुनर्जन्म वांचतो. यच्चयावत् कर्माला कोणी यज्ञासारखें मानलें म्हणजे त्याला ब्रह्मच मिळावयाचें. या यज्ञांत इंद्रियांचें संयमन करणें हा अग्नि म्हणावा. याच्या पुढची पायरी सर्वच उपभोग्य पदार्थ सोडून देणें ही होय. म्हणजे अजिबात इंद्रियांचाच होम करणें. आणि याच्याहि पुढची पायरी म्हणजे प्राणायामानें समाधि लावून प्राणांचेंहि निरोधन करणें. पण द्रव्यमय यज्ञापेक्षां ज्ञानमय यज्ञ श्रेष्ठ. कारण सर्व प्रकारच्या कर्मांचें पर्यवसान ज्ञानांत होतें, व ज्ञानानें

शांति मिळते. पण ज्ञानहि नाहीं व नुसतें श्रद्धायुक्त कर्महि नाहीं, म्हणजे मग त्यानें नाशच झाल्याशिवाय कसा राहील? कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोग अधिक चांगला. निरिच्छ कर्मयोगी हा नित्य संन्याशीच होय. संन्यास झाला तरी तो कर्मयोगाखेरीज प्राप्त होणें कठीण. निष्काम कर्म करणाऱ्याला पापपुण्य लागत नाहींत. तो जसा कांहीं प्रकृतीकडून परस्पर काम करवून घेणारा पापपुण्यरहित परमेश्वरच! अंतःसुखी तोच मोक्षाला पात्र समजावा. परमेश्वर हा एकच आहे असें जाणून, आत्मसंयमनानें सर्व भूतांचें हित साधण्यांत जो तन्मय होतो त्याला ब्रह्मनिर्वाणरूप मोक्ष बसल्या ठिकाणीं मिळतो.

कर्मयोगामध्यें कर्म हें प्रथम शांतीचें कारण होतें, व नंतर उलट शांति ही कर्माचें कारण होते. पण हें सर्व आपलें आपणच करूं शकणार. दुसरा कोण साह्य करील? म्हणूनच म्हणतात कीं, आपले मित्र आपण व आपले शत्रूहि आपणच. सहाय्यच व्हावयाचें तर पातंजल पद्धतीच्या किंवा तशा प्रकारच्या इतर योगानें तें होईल. म्हणून सतत वैराग्यपूर्वक या पातंजल योगाचाहि अभ्यास ठेवावा. ज्ञानी आणि कर्मठ या दोहोंपेक्षांहि कर्मयोगी श्रेष्ठ समजावा. मात्र कर्मयोग आचरतांना श्रद्धेनें ईश्वराला भजावें.

## ( ३ ) सूत्रमय नीति

१ आढ्यता नसावी.
२ दंभ नसावा
३ हिंसा करूं नये.
४ क्षमाशील असावें.
५ सरळता असावी.
६ शुद्धता असावी.
७ मन स्थिर असावें.
८ विरक्त राहावें.
९ अहंकार नसावा.
१० लाभ हानि हीं सम मानावीं.
११ निवळ योगक्षेमांत गढून जाऊं नये.
१२ फलाची अपेक्षा धरूं नये.
१३ कर्म हें कर्तव्य मानावें.
१४ कर्तव्याला शरण जावें.
१५ सर्व वासना टाकाव्या.

१६ आत्मतुष्ट राहावें.
१७ दुःखानें उद्विग्न होऊं नये.
१८ सुखाची इच्छा धरूं नये.
१९ षड्रिपू जिंकावे.
२० विषय व त्यांतील गोडी टाकावी.
२१ इंद्रियांना आंवरून धरावें.
२२ ममता टाकावी.
२३ नियत कर्म करावें, सोडूं नये.
२४ आसक्ति मात्र सोडावी.
२५ दानबुद्धि व परोपकारबुद्धि ठेवावी.
२६ आत्मसंतुष्ट, आत्मतृप्त राहावें.
२७ लोकसंग्रह करावा
२८ लोकांचा बुद्धिभेद करूं नये.
२९ लोकांत आनंद उत्पन्न करावा.
३० दोषदृष्टीनें कर्मांत विकल्प काढूं नये.
३१ स्वधर्मांतील गुणावर दृष्टि ठेवावी.
३२ पंचमहायज्ञ करावे.
३३ अनेक साधनांनीं आत्मशुद्धि करावी.
३४ आपणच आपला उद्धार करावा.
३५ परिग्रह म्हणजे पाश तोडावे.
३६ आहार, विहार, निद्रा नियमित असावीं.
३७ मन आत्म्याच्या ठिकाणीं एकाग्र करावें.
३८ अभ्यास व वैराग्य आचरावें.
३९ ईश्वरभक्ति करावी.
४० समाधी शिकावी.
४१ सर्व भूतांच्या ठिकाणीं मित्रभाव, प्रेम ठेवावें.
४२ इच्छा स्वातंत्र्य ठेवावें.
४३ व्यवसायात्मक बुद्धि चालवून निर्णय घ्यावा.
४४ ही बुद्धि शुद्ध ठेवावी.
४५ ही शुद्धता स्वार्थत्याग व कर्मफलत्याग यांच्या त्यागानें आणावी.
४६ ऐहिक व पारलौकिक हे एकच समजावे.
४७ स्थितप्रज्ञता हाच मोक्ष समजावा.
४८ एकांताची प्रीति असावी.

